॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ सप्तदशोऽध्यायः

## अवतरणिका

*सोळाव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात भगवंतांनी शास्त्रविधीचा त्याग करून मनास वाटेल त्या पद्धतीने आचरण करणाऱ्या पुरुषांना सिद्धी, सुख आणि परमगती मिळत नसल्याचे सांगितले. ते ऐकून अर्जुनाच्या मनात आले की, शास्त्रविधीला सम्यक् रीतीने जाणणारे लोक तर फार कमी आहेत. अधिकतर प्रमाणात असेच लोक आहेत, जे शास्त्रविधीला जाणत नाहीत, पण आपल्या कुलपरंपरा, वर्ण, आश्रम, संस्कार इत्यादींनुसार देवता इत्यादींचे श्रद्धापूर्वक यजन (पूजन) करतात. शास्त्रविधीचा त्याग झाल्याने अशा पुरुषांची नीच (आसुरी) स्थिती होत असावी आणि श्रद्धा असल्यामुळे उच्च स्थिती (दैवी) होत असावी. म्हणून त्यांची वास्तविक स्थिती कोणती? हे जाणून घेण्यासाठी अर्जुन पहिल्या श्लोकात प्रश्न करीत आहेत.* *

*अर्जुन उवाच*

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**†

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृष्ण** | = हे कृष्ण! | **यजन्ते** | = (देवता इत्यादींचे) पूजन करतात | **का** | = कोणती आहे? |
| **ये** | = जे मनुष्य | **तेषाम्** | = त्यांची | **सत्त्वम्** | = सात्त्विकी आहे |
| **शास्त्रविधिम्** | = शास्त्रविधीचा | **निष्ठा** | = निष्ठा | **आहो** | = अथवा |
| **उत्सृज्य** | = त्याग करून | **तु** | = मग | **रजः, तमः** | = राजसी-तामसी. |
| **श्रद्धया, अन्विताः** | = श्रद्धापूर्वक | | | | |

***व्याख्या*— ये शास्त्रविधिमुत्सृज्य.........सत्त्वमाहो रजस्तमः**— श्रीमद्‌भगवद्गीतेमध्ये भगवान् श्रीकृष्णाचा आणि अर्जुनाचा संवाद संपूर्ण जीवांच्या कल्याणासाठी आहे. त्या दोघांसमोर कलियुगाची जनता होती, कारण द्वापार युग समाप्त होत आले होते. भावी कलियुगी जीवांकडे दृष्टी ठेवून अर्जुन विचारतात की, महाराज! ज्या पुरुषांचा भाव फार चांगला आहे, श्रद्धा-भक्तीही उत्तम आहे, परंतु ते शास्त्रविधी जाणत नाहीत.‡ जर त्यांनी जाणला असता तर पालन केला असता, पण त्यांना कल्पनाच नाही. मग त्यांची कोणती गती होते?

पुढे येणाऱ्या पिढीत शास्त्रज्ञान फार कमी राहील. त्यांना चांगला सत्संगही मिळणे कठीण राहील, कारण पूर्वीच्या युगातही उत्तम संत महात्मे कमीच झाले आहेत,

---

* या (सतराव्या) अध्यायाला नवव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकाची (यत्करोषि यदश्नासि....तत्कुरुष्व मदर्पणम्) व्याख्या मानणे सयुक्तिक वाटत नाही. कारण नवव्या अध्यायाचा सत्तावीसावा श्लोक "भगवदर्पण-विषयक" प्रकरणात आला आहे, जे सव्वीसाव्या श्लोकापासून आरंभ झाले आहे आणि अठ्ठावीसाव्या श्लोकात (भगवदर्पणाचे फल दाखवून) समाप्त झाले आहे. परंतु येथे मनुष्याच्या श्रद्धेला ओळखण्याचा प्रसंग आहे, कारण या (सतराव्या) अध्यायाच्या आरंभी अर्जुनाचा प्रश्न मनुष्यांच्या निष्ठा, श्रद्धेविषयीचा आहे. म्हणून भगवान् त्याचे उत्तरही श्रद्धेला अनुसरूनच देतात.

† हा सतरावा अध्याय सोळाव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकावर चालू झाला आहे. त्यालाच अनुसरून अर्जुन तेथे आलेले "यः शास्त्रविधिमुत्सृज्य" (जे शास्त्रविधीचा त्याग करून) या ऐवजी येथे "ये शास्त्रविधिमुत्सृज्य" असेच म्हणून "कामकारतः" (मनास वाटेल त्या प्रकारे) ऐवजी "श्रद्धयान्विताः" (श्रद्धेने) म्हणतात. "वर्तते" (वर्तन करतो) ऐवजी "यजन्ते" (यजन करतात) म्हणतात आणि "न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्" (तो सिद्धी, सुख आणि परमगतीला प्राप्त होत नाही) ऐवजी "तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः" (त्यांची निष्ठा कोणती आहे? सात्त्विकी—दैवी-संपत्ती असलेली किंवा राजसी-तामसी—आसुरी-संपत्ती असलेली?) म्हणून भगवंताना प्रश्न करीत आहेत.

‡ शास्त्रविधीचा त्याग तीन कारणाने होत असतो (१) अज्ञानाने (२) उपेक्षेने आणि (३) विरोधाने.

मग कलियुगात तर त्याहीपेक्षा कमी होणार. कमी असले तरी जर अंत:करणातून इच्छा असेल तर त्यांना सत्संग मिळू शकेल. परंतु कलियुगात कठीण गोष्ट ही आहे की, त्या युगामध्ये दंभ, पाखंड जास्त असल्याने कित्येक दंभ आणि पाखंडी पुरुष संत बनतात. म्हणून खरे संत ओळखणे कठीण होते. अशा प्रकारे प्रथम तर संत महात्मा मिळणेच मुश्कील आणि समजा मिळालेच तर त्यातले कोणते संत कसे आहेत, याची ओळख प्राय: होत नाही आणि ओळख पटल्याशिवाय त्यांचा संग केल्याने काही विशेष लाभ होईल असेही नाही. म्हणून जे शास्त्रविधीलाही जाणत नाहीत आणि ज्यांना चांगल्या संतांचा संगही मिळाला नाही, परंतु जे काही भजन-पूजन करतात, श्रद्धेने करतात. अशा मनुष्यांची निष्ठा कोणती असते? सात्त्विकी अथवा राजसी-तामसी?

**सत्त्वमाहो रजस्तम:**—या पदांत सत्त्वगुण दैवी-संपत्तीत आणि रजोगुण व तमोगुण आसुरी-संपत्तीत घेतले गेले आहेत. रजोगुण आसुरी-संपत्तीत घेण्याचे कारण हे आहे की, रजोगुण, तमोगुणाच्या फार जवळ आहे.* गीतेमध्ये कित्येक ठिकाणी याबद्दल उल्लेख आला आहे. जसे दुसऱ्या अध्यायाच्या बासष्टाव्या त्रेसष्टाव्या श्लोकात काम अर्थात् रजोगुणापासून क्रोध आणि क्रोधापासून मोहरूपी तमोगुणाचे उत्पन्न होणे सांगितले गेले आहे.† त्याचप्रमाणे अठराव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकात हिंसात्मक आणि शोकान्वित ही रजोगुणी कर्त्याची लक्षणे सांगितली गेली आहेत आणि अठराव्या अध्यायाच्या पंचवीसाव्या श्लोकात "हिंसा" ही तामस कर्माचे लक्षण आणि पस्तीसाव्या श्लोकात "शोक" हे तामस धृतीचे लक्षण सांगितले गेले आहे. अशा प्रकारे रजोगुणाची आणि तमोगुणाची लक्षणे मिळती जुळती आहेत.

सात्त्विक भाव, आचरण आणि विचार दैवी-संपत्तीचे असतात आणि राजसी-तामसीभाव, आचरण आणि विचार आसुरी-संपत्तीचे असतात. संपत्ती अनुसारच निष्ठा असते अर्थात् मनुष्याचे जसे भाव, आचरण आणि विचार असतात, त्यानुसारच त्याची स्थिती (निष्ठा) असते. स्थितीनुसारच पुढे गती होते. आपण म्हणता की, शास्त्रविधीचा त्याग करून मनाला वाटेल त्या पद्धतीने आचरण केले तर सिद्धी, सुख आणि परमगती मिळत नाही. अहो! जर त्यांच्या निष्ठेचाच पत्ता नाही तर मग त्यांच्या गतीचा काय पत्ता लागणार? म्हणून आपण त्यांची निष्ठा कोणती ते सांगावी, मग कळेल की, ते सात्त्विक गतीला जाणारे आहेत की राजसी-तामसी गतीला जाणारे आहेत?

"कृष्ण" या शब्दाचा अर्थ "आकर्षित करणारा" असा आहे. येथे "कृष्ण" संबोधन देण्याचे तात्पर्य असे वाटते की, आपण अशा मनुष्यांना अन्तिम समयी कोणीकडे खेचून न्याल? त्यांना कोणत्या गतीला न्याल? सहाव्या अध्यायाच्या सदोतीसाव्या श्लोकातही अर्जुनाने गतीविषयक प्रश्नात "कृष्ण" संबोधन दिले आहे—"**कां गतिं कृष्ण गच्छति**" येथेही अर्जुनाच्या निष्ठा विचारण्याचे तात्पर्य गतीविषयीच आहे.

मनुष्याला भगवान् खेचून घेतात की तो कर्मानुसार स्वत: खेचला जातो? वस्तुत: कर्मानुसारच फल मिळत असते. परंतु कर्मफलाचे विधायक भगवान् असल्याने भगवंताचे खेचून घेणे संपूर्ण कर्मफलाच्या अनुषंगानेच असते. तामसी कर्माचे फल नरक असणार. तर मग भगवान् नरकाकडे खेचतील. वास्तविक नरकाद्वारा पापांचा नाश करून प्रकारान्तराने भगवान् आपल्याकडेच खेचतात. त्यांचे कोणाशीच वैर किंवा द्वेष नसतो. म्हणूनच तर आसुरी योनीत जाणाऱ्यासाठी भगवान् म्हणतात की, ते मला प्राप्त करून न घेता अधेगतीस गेले (१६।२०). कारण त्यांचे अधोगतीला जाणे भगवंताना पसंत नसते. म्हणून मनुष्य सात्त्विक असो, राजस असो अथवा तामस असो, भगवान् सर्वांना आपल्याकडेच खेचतात. याच भावाने येथे "कृष्ण" संबोधन आले आहे.

*__संबंध__—शास्त्रविधी जाणला नाही तरी प्रत्येक मनुष्यात कोणत्या ना कोणत्या प्रकारची स्वभावत: श्रद्धा तर राहतच असते. त्या श्रद्धेचे प्रकार पुढील श्लोकात सांगतात.*

*श्रीभगवानुवाच*

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु॥ २॥**

---

* तमोगुण, रजोगुण आणि सत्त्वगुण—या तिन्ही गुणात परस्पर दहापटीचे अंतर आहे. जसे एकाच्या दहापट दहा आणि दहाच्या दहापट शंभर. त्याचप्रमाणे तमोगुणापेक्षा रजोगुण दहापटीने श्रेष्ठ आहे, अर्थात् (१०) आहे आणि रजोगुणापेक्षा सत्त्वगुण दहापटीने श्रेष्ठ आहे अर्थात् (१००) आहे. तात्पर्य तमोगुण आणि रजोगुण जवळ जवळ आहेत परंतु सत्त्वगुण दोघांपासून खूप दूर आहे.

† क्रोधाचे कारण रजोगुण आहे आणि कार्य तमोगुण आहे.

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देहिनाम्** | = मनुष्यांची | **सात्त्विकी** | = सात्त्विकी | **इति** | = —अशी |
| **सा** | = ती | **च** | = तसेच | **त्रिविधा, एव** | = तीन प्रकारचीही |
| **स्वभावजा** | = स्वभावापासून उत्पन्न झालेली | **राजसी** | = राजसी | **भवति** | = असते, |
| | | **च** | = आणि | **ताम्** | = ती (तू माझ्याकडून) |
| **श्रद्धा** | = श्रद्धा | **तामसी** | = तामसी | **शृणु** | = ऐक |

*व्याख्या*— [अर्जुनांनी निष्ठा जाणून घेण्यासाठी प्रश्न केला होता, परंतु भगवान् श्रद्धेच्या अनुषंगाने त्याचे उत्तर देतात कारण श्रद्धेनुसारच निष्ठा असते]

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा**—श्रद्धा तीन प्रकारची असते. ती श्रद्धा कोणती आहे? संगजा आहे, की शास्त्रजा आहे, की स्वभावजा आहे? तर म्हणतात की, ती स्वभावजा आहे-''**सा स्वभावजा**'' अर्थात् स्वभावापासून उत्पन्न झालेली स्वत:सिद्ध श्रद्धा आहे. ती संग किंवा शास्त्र कोणापासूनही उत्पन्न झालेली नाही. ती माणसे स्वाभाविक या प्रवाहात वाहत जात आहेत आणि देवतादिकांचे पूजन करीत आहेत.

**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु**—ती स्वभावजा श्रद्धा तीन प्रकारची असते. सात्त्विकी, राजसी आणि तामसी. त्या तिन्ही वेगवेगळ्या ऐक.

मागील श्लोकात ''**सत्त्वमाहो रजस्तमः**'' पदांत ''**आहो**'' अव्यय देण्याचे तात्पर्य हे होते की, अर्जुनाच्या दृष्टीत ''**सत्त्वम्**'' ने दैवी-संपत्ती आणि ''**रजस्तमः**'' ने आसुरी-संपत्ती—हे दोनच विभाग आहेत आणि भगवान् सुद्धा बंधनाच्या दृष्टीने राजसी-तामसी दोन्हींना आसुरी संपत्तीच मानतात—''**निबंधायासुरी मता**'' (१६।५). परंतु बंधनाच्या दृष्टीने राजसी आणि तामसी एक असूनही दोहोंच्या बंधनात फरक आहे. राजस माणसे सकामभावानेच शास्त्रविहित कर्म करतात, म्हणून ते स्वर्गादी उच्च लोकात जाऊन आणि तेथील भोग भोगून पुण्य क्षीण झाल्यावर मग मृत्युलोकात परत येतात. ''**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति**'' (९।२१). परंतु तामस माणसे शास्त्रविहित कर्म करीत नाहीत म्हणून ते कामना आणि मूढतेमुळे अधोगतीला जातात—''**अधो गच्छन्ति तामसाः**'' (१४।१८). अशा प्रकारे राजस आणि तामस—दोन्ही माणसांचे बंधन कायम राहते. दोन्हींच्या बंधनातील फरकाच्या दृष्टीनेच भगवान् आसुरी-संपदा असलेल्यांची श्रद्धा राजसी आणि तामसी—अशी दोन प्रकारची सांगतात. सात्त्विकी, राजसी आणि तामसी—तिन्ही श्रद्धा वेगवेगळ्या ऐकण्याची आज्ञा देतात.

***संबंध**—पूर्व श्लोकात वर्णित स्वभावजा श्रद्धेचे तीन भेद का होतात—हे भगवान् पुढील श्लोकात सांगतात.*

## सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।
## श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥ ३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भारत! | **अयम्** | = हा | **सः, एव** | = तेच |
| **सर्वस्य** | = सर्व मनुष्यांची | **पुरुषः** | = मनुष्य | **सः** | = त्याचे स्वरूप आहे अर्थात् तीच त्याची निष्ठा (स्थिती) आहे. |
| **श्रद्धा** | = श्रद्धा | **श्रद्धामयः** | = श्रद्धामय आहे | | |
| **सत्त्वानुरूपा** | = अंत:करणानुरूप | **यः** | = (म्हणून) जो | | |
| **भवति** | = असते. | **यच्छ्रद्धः** | = जशा श्रद्धेचा आहे, | | |

*व्याख्या*—**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत**—मागील श्लोकात ज्याला ''स्वभावजा'' म्हटले गेले आहे, त्यालाच इथे ''**सत्त्वानुरूपा**'' म्हटले आहे. ''सत्त्व'' म्हणजे अंत:करण. अंत:करणानुरूप श्रद्धा असते अर्थात् अंत: करण जसे असते, त्यात सात्त्विक, राजस अथवा तामस जसे संस्कार असतात, तशीच त्याची श्रद्धा असते.

दुसऱ्या श्लोकात ज्यांना '**देहिनाम्**' पदाने म्हटले होते, त्यांनाच येथे ''**सर्वस्य**'' पदाने म्हणत आहेत. ''**सर्वस्य**'' पदाचे तात्पर्य, जे शास्त्रविधी जाणत नाहीत आणि देवतादिकांचे पूजन करतात—त्यांचीच नव्हे, तर जे शास्त्रविधी जाणोत अथवा न जाणोत, मानोत अथवा न मानोत, अनुष्ठान करोत अथवा न करोत आणि कोणत्याही वर्ण, आश्रम, सांप्रदाय, देश इत्यादींची कोणतीही व्यक्ती असो—त्या सर्वांची स्वाभाविक श्रद्धा तीन प्रकारची असते.

**श्रद्धामयोऽयं पुरुषः**—हा मनुष्य श्रद्धाप्रधान आहे. म्हणून ज्याची जशी श्रद्धा असेल तसेच त्याचे रूप असते. त्याच्याकडून

जी प्रवृत्ती होईल, ती श्रद्धेच्या अनुषंगाने, श्रद्धेनुसारच होईल.

**यो यच्छ्रद्धः स एव सः**—जो मनुष्य जशा श्रद्धेचा असेल, तशीच त्याची निष्ठा असणार आणि त्यानुसारच त्याची गती होईल. त्याचा प्रत्येक भाव आणि क्रिया त्याच्या अंतः-करणाच्या श्रद्धेनुसारच होईल. जोपर्यंत तो संसाराशी आपला संबंध ठेवील तोपर्यंत त्याचे अंतः करणानुरूपच स्वरूप असेल.

**मार्मिक गोष्ट**

मनुष्याची सांसारिक प्रवृत्ती संसारातील पदार्थांना सत्य मानणे, पाहणे, ऐकणे आणि भोगणे यामुळे होते. तसेच पारमार्थिक प्रवृत्ती परमात्म्याविषयी श्रद्धा असल्याने होते. ज्याला आपण आपल्या अनुभवाने जाणत नाही पण पूर्वीच्या स्वाभाविक संस्काराने शास्त्राने संत-महात्मा यांच्याकडून ऐकल्याने, पूज्य भावनेने त्यावर विश्वास करतो, त्याचे नाव श्रद्धा आहे. श्रद्धा असली तरच अध्यात्मिक मार्गात प्रवेश होतो, मग तो मार्ग कर्मयोगाचा असो, ज्ञानयोगाचा असो, अथवा भक्तियोगाचा असो. साध्य आणि साधन या दोन्हीवर श्रद्धा असल्याशिवाय अध्यात्मिक मार्गात प्रगती होत नाही.

मनुष्यजीवनात श्रद्धेचे फार महत्त्व आहे. मनुष्याची जशी श्रद्धा तसे त्याचे स्वरूप! तशी त्याची निष्ठा असते— "**यो यच्छ्रद्धः स एव सः**" (१७।३). तो आज जरी तसा दिसत नसला तरी काय झाले? योग्य वेळ येताच तो तसा बनेलच.

आजकाल साधकाला आपली स्वाभाविक श्रद्धा ओळखणे फार कठीण झाले आहे. कारण अनेक मत मतान्तरे झाली आहेत. कोणी ज्ञानाचे प्राधान्य सांगतो, कोणी भक्तीचे प्राधान्य सांगतो, कोणी योगाची प्रधानता सांगतो इत्यादी इत्यादी. असे निरनिराळ्या प्रकारचे सिद्धांत वाचल्याने आणि ऐकल्याने मनुष्यावर त्याचा परिणाम होतो, ज्यामुळे तो किंकर्तव्यविमूढ होतो की, मी काय करावे? माझे वास्तविक ध्येय, लक्ष्य काय आहे? मी कोणता मार्ग स्वीकारावा? अशावेळी त्याने आपल्या अंतःकरणातील भावांचा सखोल विचार करावा की, संगतीने बनलेली आवड, शास्त्राने, कोणाच्या सांगण्याने, गुरूच्या उपदेशाने बनलेली आवड, अशा ज्या अनेक आवडी आहेत, त्या सर्वात मूळाशी उद्‌बुद्ध होणारी आपली स्वाभाविक आवड कोणती?

मूळात सर्वांची स्वाभाविक आवड ही असते की, मी संपूर्ण दुःखातून मुक्त व्हावे आणि मला चिरकाल महान् सुख मिळावे. अशी आवड सर्व प्राण्यात असते. माणसात ही आवड काही प्रमाणात जागृत राहते. त्यामध्ये पूर्वजन्माचे जसे संस्कार आहेत आणि या जन्मामध्ये ज्या माता-पित्यापासून जन्मले आहेत, ज्या वातावरणात राहिले आहेत, जसे त्यांना शिक्षण मिळाले आहे, जसे दृश्य समोर आले आहे आणि ईश्वर, परलोक आणि पुनर्जन्म याविषयीची मते, मुक्ती आणि बंधन, सत्संग आणि कुसंग याबद्दल ऐकलेली मते, त्या सर्वांचा त्यांच्यावर अदृश्यरूपाने परिणाम होतो. त्या परिणामामुळे त्यांची एक धारणा बनते. त्यांची सात्त्विकी, राजसी अथवा तामसी जशी प्रकृती असेल त्यानुसारच ते त्या धारणेला पकडतात आणि त्या धारणेनुसारच त्यांची आवड-श्रद्धा बनते. त्यात सात्त्विकी श्रद्धा परमात्म्याकडे लावणारी तर राजसी-तामसी श्रद्धा संसाराकडे लावणारी असते.

गीतेमध्ये जेथे-कोठे सात्त्विकतेचे वर्णन आले आहे, ते परमात्म्याकडेच लावणारे आहे.म्हणून सात्त्विकी श्रद्धा पारमार्थिक झाली आणि राजसी-तामसी श्रद्धा सांसारिक झाली. अर्थात् सात्त्विक श्रद्धा दैवी-संपत्ती झाली आणि राजसी-तामसी श्रद्धा आसुरी-संपत्ती झाली. दैवी-संपत्तीला प्रकट करणे आणि आसुरी-संपत्तीचा त्याग करण्याच्या उद्देशाने सतरावा अध्याय चालू आहे. कारण कल्याणेच्छू मनुष्यासाठी सात्त्विकी श्रद्धा (दैवी-संपत्ती) ग्राह्य आहे आणि राजसी-तामसी श्रद्धा (आसुरी-संपत्ती) त्याज्य आहे.

जो मनुष्य आपले कल्याण इच्छितो, त्याची श्रद्धा सात्त्विकी असते. जो मनुष्य या जन्मात तसेच मृत्यूनंतरही सुख संपत्ती (स्वर्गादी) इच्छितो त्याची श्रद्धा राजसी असते आणि जो मनुष्य पशूप्रमाणे (मूढतापूर्वक) केवळ खाणे-पिणे, भोग भोगणे तसेच प्रमाद, आळस, निद्रा, खेळ-खेळणे, नाटक तमाशे इत्यादीमध्ये लागलेला असतो, त्याची श्रद्धा तामसी असते. सात्त्विक श्रद्धेसाठी सर्वात प्रथम गोष्ट ही आहे की, "परमात्मा आहे". शास्त्र, संत महात्मा, गुरुजन यांच्याकडून ऐकून पूज्यभावाने "परमात्मा आहे आणि त्याला प्राप्त करून घ्यावयाचे आहे" असा विश्वास होणे याला "श्रद्धा" म्हणतात. योग्य श्रद्धा जेथे असते तेथे प्रेम आपोआप होते. कारण ज्या परमात्म्यात श्रद्धा असते त्याच परमात्म्याचा अंश हा जीवात्मा आहे. म्हणून श्रद्धा होताच हा परमात्म्याकडे खेचला जातो. आता जो परमात्म्यापासून विमुख होऊन संसारात लागला आहे, तो देखील संसारात श्रद्धा, विश्वास असल्यानेच लागला आहे. परंतु ही वास्तविक श्रद्धा नाही, उलट श्रद्धेचा दुरुपयोग आहे. ज्याप्रमाणे हा संसारात पैशावर विशेष श्रद्धा करतो की, याने सर्व काही मिळते. ही श्रद्धा कशी झाली? कारण लहानपणी खाण्याचे आणि खेळण्याचे पदार्थ पैशानी मिळत होते. असे करता करता पैशालाच मुख्य मानले आणि त्याच्यावरच श्रद्धा बसली, त्यामुळे हा फारच पतनाकडे

गेला. ही सांसारिक श्रद्धा झाली. या पेक्षा श्रेष्ठ धार्मिक श्रद्धा असते की, मी अमुक वर्णाचा, आश्रमाचा आहे. परंतु सर्वात श्रेष्ठ श्रद्धा पारमार्थिक (परमात्मविषयक) आहे. हीच वास्तविक श्रद्धा आहे आणि यानेच कल्याण होते. शास्त्राविषयी, संत महात्म्याविषयी, तत्त्वज्ञ जीवान्मुक्ताविषयी जी श्रद्धा असते तीही पारमार्थिक श्रद्धाच असते.*

ज्यांना शास्त्राचे ज्ञान नाही आणि संत-महात्म्यांचा संग-ही प्राप्त झालेला नाही, अशा माणसांचीसुद्धा पूर्व संस्कारामुळे पारमार्थिक श्रद्धा होऊ शकते. ही कशी ओळखावी? याची ओळख अशी आहे की, अशा माणसांच्या अंत: करणात स्वाभाविक हा भाव असतो की, अशी एक महान् शक्ती (परमात्मा) आहे की, ती दिसत तर नाही पण आहे मात्र नक्की! अशा माणसांना स्वाभाविकच पारमार्थिक गोष्टी फार प्रिय वाटतात आणि ते स्वाभाविकच यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत, सत्संग, स्वाध्याय इत्यादी शुभ कर्मांमध्ये प्रवृत्त होतात. जरी त्यांनी असे कर्म केले नाही तरीही सात्त्विक आहाराच्या स्वाभाविक आवडीवरून त्यांची श्रद्धा ओळखू येते.

मनुष्य, पशु-पक्षी, लता-वृक्ष इत्यादी जितके काही स्थावर-जंगम प्राणी आहेत, ते कोणाला ना कोणाला तरी (कोणत्या तरी अंशात) आपल्यापेक्षा श्रेष्ठ अवश्य मानतात आणि मोठे मानून त्यांचा आश्रय घेतात. मनुष्यावर जेव्हा संकट ओढवते, तेव्हा तो कोणाला तरी आपल्यापेक्षा श्रेष्ठ मानून त्यांचा आश्रय घेतो. पशु-पक्षीही आपले रक्षण व्हावे असे इच्छितात आणि एखाद्या कारणाने भयभीत झाले तर कोणाचा तरी आश्रय घेतात. लताही कोणाचा तरी आश्रय घेऊनच उंच वाढते. अशा प्रकारे ज्याने एखाद्याला श्रेष्ठ मानून त्यांचा आश्रय घेतला, तर त्याने वास्तविक ''ईश्वरवाद'' सिद्धांत स्वीकार केलाच आहे असे समजावे, मग तो ईश्वराला मानो अथवा न मानो. म्हणून आयू, विद्या, गुण, बुद्धी, सामर्थ्य, योग्यता, पद, अधिकार, ऐश्वर्य इत्यादीपैकी एकापेक्षा एक श्रेष्ठ पाहता पाहता शेवटी जेथे श्रेष्ठत्वाची परिसीमा होते, तोच ईश्वर आहे, कारण सर्वात श्रेष्ठ ईश्वर आहे, त्यापेक्षा मोठा कोणी नाही—''**पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्**'' (योगदर्शन १।२६)

''तो परमात्मा सर्वांच्या पूर्वजांचाही गुरू आहे, कारण त्याचा कालाने अवच्छेद होत नाही अर्थात् तो कालमर्यादेच्या पलीकडे आहे.''

अशा प्रकारे प्रत्येक मनुष्य आपल्या दृष्टीने कोणाला ना कोणाला तरी मोठा मानतो. ही मोठेपणाची मान्यता आपापल्या अंत:करणाच्या भावानुसार वेगवेगळी असते. यामुळेच त्यांची श्रद्धाही वेगवेगळी असते.

श्रद्धा अंत:करणानुसारच असते. धारणा, मान्यता, भावना इत्यादी सर्व अंत:करणात राहतात. म्हणून अंत:-करणात ज्या सात्त्विक, राजस अथवा तामस गुणांची प्रधानता राहते, त्या गुणानुसार धारणा, मान्यता इत्यादी बनते आणि त्या धारणा, मान्यता इत्यादीनुसारच तीन प्रकारची (सात्त्विकी, राजसी अथवा तामसी) श्रद्धा बनते.

सात्त्विक, राजस आणि तामस—तिन्ही गुण सर्व प्राण्यात राहतात (१८।४०). त्या प्राण्यात कोणात सत्त्वगुणाची प्रधानता असते, कोणात रजोगुणाची प्रधानता असते आणि कोणात तमोगुणाची प्रधानता राहते. म्हणून हा नियम नाही की, सत्त्वगुणाची प्रधानता असणाऱ्या मनुष्यात रजोगुण व तमोगुण नसतात, रजोगुणाची प्रधानता असणाऱ्या मनुष्यात सत्त्वगुण आणि तमोगुण नसतात तसेच तमोगुणाची प्रधानता असणाऱ्या मनुष्यात सत्त्वगुण व रजोगुण नसतात. (१४।१०). कारण प्रकृती परिवर्तनशील आहे ''**प्रकर्षेण करणं—(भावेल्युट्) इति प्रकृतिः**'' म्हणून प्रकृतिजन्य गुणातही परिवर्तन होत राहते. म्हणून केवळ परमात्मप्राप्तीचेच ध्येय असलेल्या साधकाने ह्या येणाऱ्या-जाणाऱ्या गुणांशी आपला संबंध मानून त्यापासून विचलित होऊ नये.

प्रत्येक जीव परमात्म्याचा अंश आहे. म्हणून एखाद्यात रजोगुण, तमोगुणाची प्रधानता पाहून त्याला निकृष्ट मानू नये कारण कोणता मनुष्य कधी समुन्नत होईल याचा नेम नसतो. कारण परमात्म्याचा अंश-स्वरूप (आत्मा) तर सर्वांचा शुद्धच आहे. केवळ संगती, शास्त्र, विचार, वायुमंडळ इत्यादीमुळे अंत:करणात कोणत्या तरी एका गुणाची प्रधानता होते अर्थात् जशी संगती, शास्त्र इत्यादी मिळत असते तसेच मनुष्याचे अंत:करण बनत असते आणि त्या अंत:करणानुसारच त्याची सात्त्विकी, राजसी अथवा तामसी श्रद्धा बनते. म्हणून मनुष्याने सदा-सर्वदा सात्त्विक संग, शास्त्र, विचार, वायुमंडळ इत्यादीचेच सेवन करीत राहिले पाहिजे. असे केल्याने त्याचे अंत:करण तसेच त्यानुसार त्याची श्रद्धाही सात्त्विकी बनेल, जी त्याचा उद्धार करणारी होईल. या उलट मनुष्याने राजस-तामस संगती, शास्त्र इत्यादीचे सेवन कधीच करू नये, कारण त्यामुळे त्याची श्रद्धासुद्धा राजसी-तामसी बनेल, जी त्याची पतन करणारी होईल.

* सांसारिक श्रद्धेत ''भोगा'' ची, धार्मिक श्रद्धेत ''भावाची'' आणि पारमार्थिक श्रद्धेत ''तत्त्वाची'' प्रधानता असते.

**परिशिष्ट भाव**—श्रद्धा भाव आहे. जसा ज्याचा भाव असतो तसेच त्याचे स्वरूप असते. भाव दोन प्रकारचा असतो—सद्भाव आणि असद्भाव. जो परमात्म्याकडे अग्रेसर करतो, तो सद्भाव असतो आणि जो संसाराकडे अग्रेसर करतो, तो असद्भाव असतो. दैवी-संपत्तीत सद्भावाची मुख्यता राहते आणि आसुरी-संपत्तीत असद्भावाची मुख्यता राहते.

'मी साधक आहे'—यात जर असद्भावाची मुख्यता असेल तर अभिमान होतो आणि सद्भावाची मुख्यता असेल तर स्वाभिमान होतो. अभिमानाने आसुरी-संपत्ती येते आणि स्वाभिमानाने दैवी-संपत्ती येते. दुसऱ्यांपेक्षा आपल्यात विशेषता दिसल्यास अभिमान होतो आणि आपले कर्तव्य पाहिल्यास स्वाभिमान होतो की, मी साधन-विरुद्ध काम कसे करू शकतो! अभिमान झाल्यास मनुष्य तर साधन-विरुद्ध काम करून बसेल, परंतु स्वाभिमान झाल्यास त्याला साधन-विरुद्ध काम करण्यास लाज वाटेल. स्वाभिमान झाल्यास तो सात्त्विकी कक्षेत जाईल आणि अभिमान झाल्यास राजसी-तामसी कक्षेत जाईल.

***संबंध**—आपल्या इष्टाच्या यजन-पूजनद्वारा मनुष्याच्या निष्ठेची ओळख कशा प्रकारे होते ते आता सांगत आहेत.*

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सात्त्विकाः** | = सात्त्विक मनुष्य | **यक्षरक्षांसि** | = यक्ष आणि राक्षसांचे | **जनाः** | = मनुष्य आहेत, (जे) |
| **देवान्** | = देवतांचे | **च** | = आणि | **प्रेतान्** | = प्रेत (आणि) |
| **यजन्ते** | = पूजन करतात, | **अन्ये** | = दुसरे (जे) | **भूतगणान्** | = भूतगण यांचे |
| **राजसाः** | = राजस मनुष्य | **तामसाः** | = तामस | **यजन्ते** | = पूजन करतात. |

*व्याख्या*—**यजन्ते सात्त्विका देवान्**—सात्त्विक अर्थात् दैवी-संपत्तीची माणसे देवांचे पूजन करतात. येथे ''देवान्'' शब्दांतर्गत विष्णू, शंकर, गणेश, शक्ती आणि सूर्य ह्या ईश्वर कोटीतील पाच देवतांचा अंतर्भाव होतो. कारण दैवी-संपत्तीत ''देव'' शब्द ईश्वर वाचक आहे आणि त्यांची संपत्ती अर्थात् दैवी-संपत्ती मुक्ती देणारी आहे ''**दैवी संपद्विमोक्षाय**'' (१६।५). ती दैवी-संपत्ती ज्यांच्यात प्रगट होते, त्या (दैवी-संपत्तीवान्) साधकांची स्वाभाविक श्रद्धा ओळखण्यासाठी येथे ''**यजन्ते सात्त्विका देवान्**'' पद आलेले आहे.

ईश्वरकोटीच्या देवातांमध्येसुद्धा साधकांची श्रद्धा वेगवेगळी असते. एखाद्याची श्रद्धा भगवान् विष्णू (राम, कृष्ण इत्यादी) वर असते, कोणाची भगवान् शंकरावर असते, कोणाची भगवान् गणेशावर असते, कोणाची भगवती शक्तीवर असते आणि कोणाची भगवान् सूर्यावर असते. ईश्वराच्या ज्या रूपात त्यांची स्वाभाविक श्रद्धा असते, त्यांचेच ते विशेषतेने यजन पूजन करतात.

बारा आदित्य, आठ वसू, अकरा रुद्र आणि दोन अश्विनीकुमार—या तेहतीस प्रकारच्या शास्त्रोक्त देवतांचे निष्कामभावाने पूजन करणे हे देखील ''**यजन्ते सात्त्विका देवान्**'' च्या अंतर्गत समजावे.

**यक्षरक्षांसि राजसाः**—राजस मनुष्य यक्ष आणि राक्षसांचे पूजन करतात. यक्ष-राक्षस हे देवयोनीत आहेत. यक्षात धनसंग्रहाची मुख्यता राहते आणि राक्षसात दुसऱ्याचा नाश करण्याची मुख्यता राहते. आपल्या कामना पूर्तीसाठी आणि दुसऱ्यांचा विनाश करण्यासाठी राजस माणसांमध्ये यक्ष आणि राक्षसांचे पूजन करण्याची प्रवृत्ती असते.

**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः**—तामस मनुष्य प्रेत आणि भूतांचे पूजन करतात. जे मेले त्यांना प्रेत म्हणतात आणि जे भूत योनीत गेले त्यांना ''भूत'' म्हणतात.

येथे ''प्रेत'' शब्दांतर्गत आपल्या पितरांचा समावेश करू नये. कारण जे आपले कर्तव्य म्हणून निष्कामभावाने आपापल्या पितरांचे पूजन करतात ते तामस म्हटले जात नाहीत, उलट सात्त्विकच म्हटले जातील. आपापल्या पितरांच्या पूजनांचा भगवंतांनी निषेध केला नाही—''**पितॄन्यान्ति पितृव्रताः**'' (९।२५) तात्पर्य जे पितरांचे सकामभावाने पूजन करतात की, पितरांनी आमचे रक्षण करावे. आम्ही जसे आमच्या पिता-पितामह इत्यादीसाठी श्राद्ध, तर्पणादिक करतो तसेच आमच्या भावी कुलपरंपरेतील वंशजांनीही करावे, अशा सकामभावाने जे पितरांचे पूजन करतात, ते पितरांना प्राप्त होतात. परंतु आपले माता-पिता, आजोबा-आजी इत्यादी पितरांचे पूजन केल्याने पितरांना प्राप्त होत नाहीत. जे पितृऋणातून मुक्त होणे आपले कर्तव्य समजून निष्कामभावाने पितरांचे पूजन करतात, ते सात्त्विक पुरुष आहेत, राजस नव्हेत. पितृलोकाला तेच जातात जे ''**पितृव्रताः**'' असतात अर्थात् जे पितरांना सर्वोपरी आणि आपले इष्ट मानतात तसेच पितरांवरच निष्ठा ठेवतात. असे लोक पितृलोकाला तर जाऊ शकतात, परंतु त्यापुढे ते जाऊ शकत नाहीत.

कुत्रा, कावळा इत्यादींनाही जे निष्कामभावाने अन्न देतात (शास्त्रात असे विधान आहे), त्यामुळे त्यांची योनी प्राप्त होत नाही. कारण ते त्यांचे इष्ट नाही. ते तर शास्त्राज्ञेप्रमाणे तसे करतात. त्याचप्रमाणे पितरांचे श्राद्ध-तर्पण इत्यादीही शास्त्राज्ञेनुसार निष्कामभावपूर्वक केल्याने पितृयोनी प्राप्त होत नाही. शास्त्र अथवा भगवंताची आज्ञा समजून केल्याने त्यांचा उद्धार होईल. म्हणून निष्कामभावाने केल्या गेलेल्या शास्त्रविहित नारायणबली, गयाश्रद्ध इत्यादी प्रेत-कर्मांना तामस समजू नये. कारण हे तर मृत प्राण्यांच्या सद्‌गतीसाठी केली जाणारी आवश्यक कर्मे आहेत, ती मेलेल्या माणसासाठी शास्त्राज्ञेनुसार प्रत्येकांनी केली पाहिजेत.

आपण शास्त्रविहित यज्ञादी शुभ कर्म करताना गणेश, नवग्रह षोडश-मातृका आदींचे पूजन शास्त्राज्ञेनुसार निष्काम-भावाने करतो. हे वास्तविक नवग्रहादिकांचे पूजन नसून शास्त्राचेच पूजन, आदर झाला. जसे स्त्री पतीची सेवा करते तर तिचे कल्याण होते. विवाह तर प्रत्येक मनुष्याचा होऊ शकतो. राक्षसाचाही, आसुराचाही होऊ शकतो. तेही पती होऊ शकतात. परंतु वास्तविक कल्याण पतीच्या सेवेने होत नाही, तर पतीची सेवा करणे—पातिव्रत्य धर्माचे पालन करणे ही ऋषी, शास्त्र, भगवंताची आज्ञा आहे. म्हणून त्यांच्या आज्ञेच्या पालनानेच कल्याण होते.

देवता इत्यादींच्या पूजनाने पूजकाची (पूजा करणाऱ्या) गती तशीच होईल—हे सांगण्यासाठी येथे ''यजन्ते'' पद आलेले नाही. अर्जुनाने शास्त्रविधीचा त्याग करून यजन-पूजन करणाऱ्याची निष्ठा विचारली होती. म्हणून आपापल्या इष्टानुसार (पूज्य) पूजकाची निष्ठा, श्रद्धा असते. याची ओळख करून देण्यासाठीच ''यजन्ते'' पद आलेले आहे.

**परिशिष्ट भाव**—देवतांचे पूजन करणारे सात्त्विक मनुष्य शरीर सुटल्यावर देवतांना प्राप्त होतात. यक्ष-राक्षसांचे पूजन करणारे राजस मनुष्य यक्ष-राक्षसांना प्राप्त होतात आणि भूत-प्रेतांचे पूजन करणारे तामस मनुश्य भूत-प्रेतांना प्राप्त होतात. (गीता—नवव्या अध्यायाचा पंचवीसावा श्लोक).

गीतेत 'यज्ञ' शब्द फार व्यापक आहे ज्याच्या अंतर्गत यज्ञ, दान, तप व्रत इत्यादी संपूर्ण कर्तव्यकर्म येतात (गीता—चवथ्या अध्यायाचा चोवीसावा-पंचवीसावा श्लोक). म्हणून येथेही 'यजन्ते' पदाच्या अंतर्गत संपूर्ण कर्तव्यकर्म घ्यावे, ज्यात यज्ञ मुख्य आहे.

**'प्रेतान्भूतगणांश्चान्ये'**—आपले जे पितर आहेत. ते दुसऱ्यांसाठी भूत आहेत आणि दुसऱ्याचे जे पितर आहेत ते आपल्यासाठी भूत आहेत. पितरांचे पूजन करणे तामस नाही, परंतु भुतांचे भूजन करणे तामस आहे.

***संबंध**—आत्तापर्यंत, जे शास्त्रविधी न जाणल्यामुळे (अज्ञतापूर्वक) शास्त्रविधीचा त्याग करतात पण आपले इष्ट व त्यांचे यजन पूजन त्यावर श्रद्धा ठेवतात, अशा माणसांचे वर्णन झाले. आता विरोधपूर्वक शास्त्रविधीचा त्याग करणाऱ्या श्रद्धारहित माणसांच्या क्रियांचे (वर्तनाचे) वर्णन पुढील दोन श्लोकांत करतात.*

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः।**
**दम्भाहङ्कारसंयुक्ताः कामरागबलान्विताः॥५॥**
**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः।**
**मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान्॥६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ये** | = जे | **कामराग-** | = (जे) भोगपदार्थ, | | स्थित असलेल्या |
| **जनाः** | = मनुष्य | **बलान्विताः** | आसक्ती आणि हट्ट यांनी युक्त आहेत, | **माम्, एव** | = मज परमात्म्यालाही |
| **अशास्त्रविहितम्** | = शास्त्रविधीरहित | | | **कर्शयन्तः** | = कृश करणारे आहेत, |
| **घोरम्** | = घोर | **शरीरस्थम्** | = (जे) शरीर स्थित | **तान्** | = त्या |
| **तपः** | = तप | **भूतग्रामम्** | = पाच भूतांना अर्थात् पंचभौतिक शरीराला | **अचेतसः** | = अज्ञान्यांना (तू) |
| **तप्यन्ते** | = करतात, | | | **आसुरनिश्चयान्** | = आसुर निष्ठा असणारे (आसुरी-संपत्ती असणारे) |
| **दम्भाहङ्कार-** | = (जे) दंभ व अहंकार | | | | |
| **संयुक्ताः** | यांनी चांगल्याप्रकारे युक्त आहेत, | **च** | = तसेच | | |
| | | **अन्तःशरीरस्थम्** | = अंतःकरणात | **विद्धि** | = समज. |

*व्याख्या*— **अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः**—शास्त्रात ज्याचे विधान नाही, उलट निषेध आहे, असे घोर तप करण्यात ज्यांची आवड असते अर्थात् त्यांची आवड सदा शास्त्रविरुद्धच असते. कारण तामसी बुद्धी (१८।३२) असल्याने ते स्वतः तर शास्त्र जाणत नाहीत आणि दुसऱ्याने कोणी सांगितले तरी त्याचे ते मानू इच्छित नाहीत आणि तसे करूही इच्छित नाहीत.

**दम्भाहङ्कारसंयुक्ताः**—त्यांच्या मनात ही गोष्ट अगदी पक्की बसलेली असते की, आजकाल जे काही भजन, ध्यान, स्वाध्याय इत्यादी करतात ते सर्व ढोंग आहे. दंभाशिवाय त्यात दुसरे काहीच नाही. म्हणून ते स्वतःही ढोंगच करतात. त्यांच्यात आपल्या बुद्धी, कौशल्य, चातुर्य, ज्ञान इत्यादींचा इतका अभिमान भरलेला असतो की, आम्हीच ज्ञानी, आम्ही लोकांना समजावू शकतो, आम्ही त्यांना योग्य मार्ग दाखवू शकतो, आम्ही शास्त्रातल्या गोष्टी कशाला ऐकायच्या, आम्हाला काय कमी माहिती आहे? आमच्या गोष्टी ऐकाल तर तुम्हालाही माहिती होईल इत्यादी.

**कामरागबलान्विताः**—"काम" शब्द भोग पदार्थांचा वाचक आहे. त्या पदार्थांमध्ये रंगून जाणे, तल्लीन होणे, एकरस होणे "राग" आहे आणि त्यांना प्राप्त करण्याचा आणि कायम ठेवण्याचा जो हट्ट, दुराग्रह आहे ते "बल" आहे. यांनी ते सदा युक्त असतात. त्या आसुर स्वभावाच्या लोकांचा असा भाव असतो की, मनुष्यशरीर मिळाल्यावरही जर हे भोग भोगले नाहीत तर हे मनुष्यशरीर पशूसारखेच झाले. सांसारिक भोग-सामुग्री मनुष्याने मिळविली नाही तर मग काय मिळविले? मनुष्यशरीर मिळवूनही मनोवांछित भोग पदार्थ मिळाले नाहीत तर मग त्याचे जीवनच व्यर्थ आहे इत्यादी-इत्यादी. अशा प्रकारे प्राप्त सामुग्री भोगण्यात सदा तल्लीन राहतात आणि धन, संपत्ती इत्यादी भोग सामुग्री प्राप्त करण्यासाठी दुराग्रहाने, जिद्दीने तप करीत असतात.

**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्रामम्**—ते शरीरात असणाऱ्या पाचही भूतांना (पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश) कृश करतात, शरीर सुकवितात आणि यालाच तप समजतात. शरीराला कष्ट दिल्याशिवाय तप होत नाही अशी त्यांची स्वाभाविक धारणा राहते.

पुढे चौदाव्या, पंधराव्या आणि सोळाव्या श्लोकात जेथे शरीर, मन, वाणी यांच्या तपाचे वर्णन आले आहे, तेथे शरीराला कष्ट देण्याचा उल्लेख आलेला नाही. ते तप फार शांततेने होते. परंतु येथे ज्या तपाविषयी म्हटले आहे ते, शास्त्रविरुद्ध भयानक तप आहे आणि अविधिपूर्वक शरीराला कष्ट देऊन केले जाते.

**मां चैवान्तः शरीरस्थम्**—भगवान् म्हणतात की, असे लोक हृदयात स्थित असलेल्या मला परमात्म्याला देखील कृश करतात, दुःख देतात. कसे? तर ते माझ्या मतानुसार, आज्ञेप्रमाणे वागत नाहीत, उलट विरुद्ध वागतात.

अर्जुनाने विचारले होते की, ते कोणत्या निष्ठेचे आहेत? सात्त्विक आहेत की राजस-तामस? दैवी-संपत्तीचे आहेत की आसुरी-संपत्तीचे आहेत? तर भगवान् म्हणतात—त्यांना आसुर निश्चयी समजावे—"**तान्विद्धि आसुरनिश्चयान्**". येथे "**आसुर निश्चयान्**" पद सामन्य आसुरी-संपत्ती धारकाचे वाचक नाही, तर त्यातील अत्यंत नीच, विशेष नास्तिकांचे वाचक आहे.

## मार्मिक संकेत

चौथ्या श्लोकात शास्त्रविधी न जाणणाऱ्या श्रद्धायुक्त मनुष्याकडून केल्या जाणाऱ्या पूजनासाठी "**यजन्ते**" पद आले आहे. परंतु येथे शास्त्रविधीचा त्याग करणाऱ्या मनुष्याकडून केल्या जाणाऱ्या पूजनासाठी "**तप्यन्ते**" पद आले आहे. याचे कारण आसुर निश्चय असणाऱ्या माणसांची तप करण्यातच पूज्यबुद्धी असते. तपच त्यांचा यज्ञ असतो आणि ते मनाला वाटेल त्या रीतीने शरीराला कष्ट देण्यातच तप मानतात. त्यांच्या तपाचे लक्षण शरीराला कष्ट देणे सुकविणे हेच आहे. ते तपाला फार महत्त्व देतात, त्याला फार चांगले समजतात. परंतु भगवंतांना आणि शास्त्रांना मानीत नाहीत. तप देखील तेच करतात जे शास्त्रविरुद्ध असते. फार उपाशी राहणे, काट्यावर झोपणे, उलटे लटकणे, एका पायावर उभे राहणे, शास्त्राज्ञेविरुद्ध अग्नीत तापणे, आपले शरीर, मन, इंद्रियांना कोणत्याही प्रकाराने कष्ट देणे इत्यादी. हे सर्व आसुर निश्चय असलेल्यांचे तप आहे.

सोळाव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात शास्त्रविधी जाणत असतानाही त्याची उपेक्षा करून दान, सेवा, उपकार इत्यादी शुभकर्म करण्याचा उल्लेख आला आहे, ती कर्मे इतकी वाईट नाहीत कारण त्यांचे दान इत्यादी कर्म शास्त्रविधी युक्त नाहीत पण शास्त्रनिषिद्धही नाहीत. परंतु येथे जे शास्त्रविहित नाही त्यालाच श्रेष्ठ मानून मनाला वाटेल त्या पद्धतीने कर्म करण्याची गोष्ट आहे. दोन्हीत काय फरक झाला? तेवीसाव्या श्लोकात सांगितलेल्या लोकांना सिद्धी, सुख व परमगती मिळणार नाही अर्थात् नाममात्र शुभकर्माचे पूर्ण फल मिळणार नाही. परंतु येथे म्हटलेल्या लोकांना तर नीच योनी तसेच नरकांची

प्राप्ती होईल कारण यांचे ठिकाणी दंभ, अभिमान इत्यादी आहेत. हे शास्त्रांना मानीतही नाहीत, ऐकतही नाहीत आणि कोणी सांगितले तरी ऐकूही इच्छित नाहीत.

सोळाव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात शास्त्राचा "उपेक्षापूर्वक" त्याग आहे. याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात शास्त्राचा "अज्ञतापूर्वक" त्याग आहे आणि येथे शास्त्राचा "विरोधपूर्वक" त्याग आहे. पुढे तामस यज्ञादीमध्येही शास्त्राची उपेक्षा आहे. परंतु येथे श्रद्धा, शास्त्रविधी, प्राणीसमुदाय आणि भगवान्—या चारींशी विरोध आहे. असा विरोध दुसऱ्या ठिकाणी आलेल्या राजसी-तामसी वर्णनात नाही.

*संबंध—एखादा मनुष्य जर कोणत्याच प्रकारे यजन करीत नसेल तर त्याची श्रद्धा कशी ओळखावयाची ? हे सांगण्यासाठी भगवान् आहाराच्या रुचीवरून आहारीची निष्ठा ओळखण्याचे प्रकरण प्रारंभ करीत आहेत.*

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु॥७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आहारः, अपि** | = आहारही | **तथा** | = तसेच | | गुणांना अनुसरून |
| **सर्वस्य** | = सर्वांना | **यज्ञः** | = यज्ञ, | | तीन प्रकारची |
| **त्रिविधः** | = तीन | **तपः** | = तप (आणि) | | आवड असते.) |
| | प्रकारचा | **दानम्** | = दान (ही तीन | **तेषाम्** | = (तू) त्यांचे |
| **प्रियः** | = प्रिय | | प्रकारचे प्रिय | **इमम्** | = हे |
| **भवति** | = असतो | | असतात अर्थात् | **भेदम्** | = प्रकार |
| **तु** | = आणि | | शास्त्रीय कर्मांतही | **शृणु** | = ऐक. |

*व्याख्या—* **आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः**—चौथ्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाच्या प्रश्नानुसार माणसांच्या निष्ठेच्या परीक्षेसाठी सात्त्विक, राजस आणि तामस तीन प्रकारचे यजन सांगितले. परंतु ज्यांची श्रद्धा, रुची, प्रियता भजन-पूजनात नाही, त्यांच्या निष्ठेची ओळख कशी व्हावी? याच्यासाठी सांगितले की, ज्यांची यजन-पूजनात श्रद्धा नाही, अशा माणसांना शरीरनिर्वाहासाठी भोजन तर करावेच लागते मग ते नास्तिक असोत, आस्तिक असोत, वैदिक, ईसाई, पारशी, यहूदी, यवन इत्यादी कोणत्याही सांप्रदायाचे असोत. त्या सर्वांसाठी येथे "**आहारस्त्वपि**" पद देऊन म्हटले आहे की, निष्ठेच्या परीक्षेसाठी केवळ यजन-पूजनच नाही, तर भोजनाच्या रुचीवरूनही त्यांच्या निष्ठेची ओळख होईल.

मनुष्याचे मन स्वाभाविकच ज्या भोजनासाठी लालायित होते अर्थात् ज्या भोजनाची गोष्ट ऐकून, त्याला पाहून, त्याला चाखून मन आकृष्ट होते, त्यानुसार त्याची सात्त्विकी, राजसी, तामसी निष्ठा मानली जाते.

या ठिकाणी एखादा असेही म्हणू शकतो की, सात्त्विक, राजस आणि तामस आहार कसा कसा असतो. हे सांगण्यासाठी हे प्रकरण आले आहे. स्थूल दृष्टीने पाहिल्यास असेच वाटते. पण सखोल विचार केल्यावर असे वाटणार नाही. वास्तविक येथे आहाराचे वर्णन नाही, तर आहारीच्या रुचीचे वर्णन आहे. म्हणून आहारीच्या श्रद्धेची ओळख कशी होईल ? हे सांगण्यासाठीच हे प्रकरण आले आहे.

येथे "**सर्वस्य**" आणि "**प्रियः**" ही पदे हे सांगण्यासाठी आली आहेत की, प्रत्येकाची कोण कोणत्या भोजनात रुची असते, ज्यावरुन त्याच्या सात्त्विकी, राजसी आणि तामसी निष्ठेची ओळख होईल. त्याचप्रमाणे "**यज्ञस्तपस्तथा दानम्**"* हे पद हे सांगण्यासाठी आले आहे की, जितकी काही शास्त्रीय कर्म आहेत, त्यातही त्या माणसांची यज्ञ, तपादी कोण कोणत्या कर्मात कशीकशी रुची, प्रियता असते. येथे "**तथा**" म्हणण्याचे तात्पर्य, जसे पूजन तीन प्रकारचे असते आणि जसा आहार तीन प्रकारचा असतो, त्याचप्रमाणे शास्त्रीय यज्ञ, तप इत्यादी कर्मही तीन प्रकारची असतात. यावरुन येथे एक गोष्ट ही सिद्ध होत आहे की, शास्त्र, सत्संग, विवेचन, वार्तालाप, गोष्ट, पुस्तक, व्रत, तीर्थ, व्यक्ती इत्यादी जे जे काही समोर येईल. त्यांच्यातही जे सात्त्विक असेल ते सात्त्विक मनुष्याला जे राजस असेल ते राजस मनुष्याला आणि

* जरी येथे "यज्ञ" शब्द होमरूप यज्ञाचाच वाचक आहे, संपूर्ण कर्तव्यकर्माचा नाही (कारण यज्ञाबरोबर तप व ज्ञान वेगवेगळे आले आहेत.) तरी पण गौणत्वाने तीर्थ, व्रत इत्यादी कर्तव्यकर्मही यात घेतली जाऊ शकतात.

जे तामस असेल ते तामस मनुष्याला प्रिय वाटेल.

**तेषां भेदमिमं शृणु**—यज्ञ, तप, आणि दानाचे प्रकार ऐक अर्थात् मनुष्याची स्वाभाविक रूची, प्रवृत्ती आणि प्रसन्नता कशा कशात असते हे तू ऐक. जसे आपल्या रुचीनुसार एखादा ब्राह्मणाला दान देणे पसंत करतो, तर दुसरा अन्य साधारण मनुष्याला दान देणेच पसंत करतो, एखादा शुद्ध आचरणाच्या व्यक्तीशी मित्रता करतो, तर दुसरा ज्यांचे खाणे-पिणे, आचरण इत्यादी शुद्ध नाहीत, अशा माणसांशी मित्रता करतो इत्यादी-इत्यादी.*

तात्पर्य, सात्त्विक माणसांची रुची सात्त्विक खाणे-पिणे, राहणीमान, कार्य, समाज, व्यक्ती इत्यादीत असते आणि त्यांचीच संगती करणे त्यांना चांगली वाटते. राजस माणसांची रुची राजस खाणे-पिणे, राहणीमान, कार्य, समाज, व्यक्ती इत्यादीत असते आणि त्यांचीच संगती करणे त्यांना चांगली वाटते. तामस माणसांची रुची तामस खाणे-पिणे, राहणीमान्, इत्यादीत तसेच शास्त्रनिषिद्ध आचरण करणाऱ्या मनुष्याबरोबर उठणे-बसणे, खाणे-पिणे, गप्पा करणे, बरोबर राहणे, मित्रता करणे इत्यादीत असते आणि त्यांचीच संगती त्यांना चांगली वाटते तसेच तशाच आचरणात त्यांची प्रवृत्ती असते.

**परिशिष्ट भाव**—मनुष्याद्वारा स्वभावानुरूप होणाऱ्या क्रिया दोन प्रकारच्या असतात—व्यावहारिक आणि शास्त्रीय. म्हणून येथे 'आहार' याच्या अंतर्गत व्यावहारिक (खाणे-पिणे, राहाणीमान इत्यादी) आणि 'यज्ञ-तप-दान' यांच्या अंतर्गत शास्त्रीय क्रिया समजाव्या.

## आयु:सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
## रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥

**आयु:सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः** = आयू, सत्त्व, गुण बल, आरोग्य सुख आणि प्रसन्नता वाढविणारे, **स्थिराः** = स्थिर राहणारे, **हृद्याः** = हृदयाला शक्ती देणारे, **रस्याः** = रसयुक्त (तसेच) **स्निग्धाः** = स्निग्ध— **आहाराः** = (असे) आहार अर्थात् भोजन करण्याचे पदार्थ **सात्त्विकप्रियाः** = सात्त्विक मनुष्याला प्रिय असतात.

***व्याख्या*— आयुः**—जो आहार करण्याने मनुष्याचे आयुष्य वाढते. **सत्त्वम्**—सत्त्व-गुण वाढतो. **बलम्**—शरीर, मन, बुद्धी इत्यादीत सात्त्विक बल तसेच उत्साह उत्पन्न होतो.

**आरोग्यः**—शरीरात निरोगता वाढते. **सुखम्**—सुख शांती प्राप्त होते आणि **प्रीतिविवर्धनाः**—ज्यांना पाहिल्यानेच प्रियता निर्माण होते.† ते बरे वाटतात.

अशा प्रकारचे **स्थिराः**—जे पचण्यास जड नाही तर सुपाच्य आहे. ज्याचे सार शरीरात दीर्घ काल शक्ती देत राहते आणि **हृद्याः**—हृदय, फुफ्फुसे इत्यादींना शक्तीदायक व बुद्धीत सौम्यभाव आणणारे. **रस्याः**—फल, दूध, साखर इत्यादी रसयुक्त पदार्थ. **स्निग्धाः**—तूप, लोणी, बदाम, काजू, किसमिस, सात्त्विक पदार्थापासून निघालेले तेल इत्यादी स्नेहयुक्त भोजनाचे पदार्थ, तेही पूर्ण शिजलेले व ताजे आहेत.

**आहाराः सात्त्विकप्रियाः**—असे भोज्य पदार्थ (भोज्य, पेय, लेह्य, आणि चौष्य) सात्त्विक मनुष्याला प्रिय असतात. म्हणून अशा आहारात रुची असल्यास तो मनुष्य सात्त्विक आहे अशी ओळख होते.

## कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
## आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

---

* मृगा मृगैः सङ्गमनुव्रजन्ति गावश्च गोभिस्तुरगास्तुरङ्गैः ।
मूर्खाश्च मूर्खैः सुधयः सुधीभिः समानशीलव्यसनेषु सख्यम् ॥ (पञ्चतन्त्र मित्रभेद ३०५)

ज्याप्रमाणे पशूंमध्ये हरिण हरिणांबरोबर, गायी गायींबरोबर, घोडे घोड्याबरोबरच विचरण करतात, त्याचप्रमाणे मनुष्यातही मूर्ख मूर्खांबरोबर आणि विद्वान विद्वानांबरोबर मित्रतेचा व्यवहार करतात; कारण मित्रता समान स्वभाव, आचरण इत्यादीमध्येच होते.

† तसे तर अनुकूल आहार मिळाल्यास राजस पुरुषालाही आवडेल पण ती आवड परिणामी विष होईल. (१८।३८) त्याचप्रमाणे तामस पुरुषालाही आवडेल पण ती आवड परिणामी त्याला मूढतेत अर्थात् अतिनिद्रा, आळस आणि प्रमाद (खेळ-तमाशे, व्यर्थ बडबड व दुर्व्यसन इत्यादी) यात लावील (१८।३९).

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कट्वम्ल-** | = अती कडू, अती | | जळजळीत | **इष्टाः** | = प्रिय असतात, (जे) |
| **लवणात्युष्ण-** | आंबट, अती खारट, | **आहाराः** | = आहार अर्थात् | **दुःखशोका-** | = दुःख शोक |
| **तीक्ष्णरूक्ष-** | अती गरम, अती | | भोजनाचे पदार्थ | **मयप्रदाः** | आणि रोग |
| **विदाहिनः** | तिखट, अती रूक्ष | **राजसस्य** | = राजस | | उत्पन्न करणारे |
| | आणि अती | | मनुष्याला | | असतात. |

*व्याख्या*— **कटु**—कारले, कोरफड इत्यादी अत्यंत कडू पदार्थ. **अम्ल**—चिंच, आमसूल, लिंबू, ताक, पदार्थ सडवून बनविलेला सिरका इत्यादी अतिशय आंबट पदार्थ. **लवणम्**—अधिक खारट पदार्थ, **अत्युष्णम्**—ज्यातून वाफ निघत आहे असे अत्यंत गरम पदार्थ. **तीक्ष्णम्**—जे खात असताना नाक, डोळे, मुख यातून पाणी निघून अंगाला घाम सुटेल असे लाल मिरच्या इत्यादी अधिक तिखट पदार्थ. **रूक्षम्**—ज्यात दूध तुपासारख्या स्निग्ध पदार्थांचा संबंध नाही असे कोरडे पदार्थ. फुटाणे, लाह्या, सातू इत्यादी अधिक कोरडे पदार्थ आणि **विदाहिनः**—मोहरी इत्यादी अधिक दाहकारक पदार्थ (मोहरी दोन-तीन तास ताकात भिजविली तर त्यात एक खमीर नावाचा पदार्थ तयार होतो तो अती दाहकारक असतो).

**आहारा राजसस्येष्टाः**—अशा प्रकारचे भोजनाचे पदार्थ (भोज्य, पेय, लेह्य, चोष्य) राजस माणसांना प्रिय असतात. यावरुन त्यांच्या निष्ठेची ओळख होते.

**दुःखशोकामयप्रदाः**—परंतु असे पदार्थ परिणामी दुःख, शोक आणि रोग उत्पन्न करणारे असतात. आंबट, तिखट आणि दाहकारक असे पदार्थ खाताना जी जळजळ होते, ते दुःख आहे, भोजनोत्तर मन प्रसन्न होत नाही पण स्वाभाविक चिंता असते, हा शोक आहे. अशा भोजनाने बहुधा शरीरात रोग उत्पन्न होतात.

## यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्।
## उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥ १०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **पर्युषितम्** | = शिळे | | (मांस इत्यादीही) |
| **भोजनम्** | = भोजन | **च** | = आणि | | आहे (ते) |
| **यातयामम्** | = विटलेले, | **उच्छिष्टम्** | = उष्टे आहे | **तामसप्रियम्** | = तामस |
| **गतरसम्** | = रसरहित, | **च** | = तसेच (जे) | | मनुष्याला |
| **पूति** | = दुर्गंधीयुक्त, | **अमेध्यम्, अपि** | = महान् अपवित्रही | | प्रिय असते. |

*व्याख्या*—**यातयामम्**—अर्धवट कच्चे, जास्त शिजलेले, नासलेले ऋतू व्यतिरिक्त फळे इत्यादी, फ्रिजमध्ये टिकवून ठेवलेले भाजी, फलादिक भोजनाचे पदार्थ.

**गतरसम्**—उन्हाने ज्यांचा स्वाभाविक रस सुकून गेला आहे अथवा यंत्राने ज्यातील सत्त्व काढून घेतले आहे असे दूध, फळे इत्यादी.

**पूति**—काही पदार्थ सडवून निर्माण केलेली दारू* आणि स्वाभाविक दुर्गंध असणारे कांदा लसूण इत्यादी.

**पर्युषितम्**—पाणी आणि मीठ मिसळून केलेली भाजी, भाकरी इत्यादी पदार्थ एक रात्र उलटल्यावर शिळे म्हटले जातात. परंतु केवळ शुद्ध दूध, तूप, साखर इत्यादींनी बनविलेले अथवा अग्नीवर तयार केलेले पेढा,

---

* मद्यपान करणाऱ्यास शास्त्रात महापापी म्हटले आहे—

स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चाचरंस्तैरिति।

(छान्दोग्योपनिषद् ५।१०।९)

अर्थात् सुवर्णाची चोरी करणारा, मदिरा (दारू) पिणारा, गुरुपत्निगमन करणारा, ब्राह्मणाची हत्या करणारा—हे चारही महापापी आहेत आणि यांची संगती करणारा पाचवा महापापी आहे.

यावरुन सिद्ध होते की, मद्यपान सर्वथा निंदनीय, मांसाहारापेक्षाही अधिक निंदनीय आणि पतन करणारे आहे.

गंगा सर्वांना शुद्ध करणारी आहे परंतु गंगेत जर मदिरापात्र टाकले तर ते शुद्ध होत नाही. जर मदिरापात्रसुद्धा (दारूने भरून रिकामे केलेले) इतके अशुद्ध होते तर ती मदिरा पिणारा किती अशुद्ध असेल. याची कल्पनाही करवत नाही.

मदिरा तयार करण्यात असंख्य जीवांची हत्या होते. मद्यपानाने होणारी सर्वात भयंकर हानी ही आहे की, यामुळे अंतःकरणात राहणारे धर्माचे अंकुर नष्ट होतात. तात्पर्य मनुष्याच्या अंतः करणात ज्या धार्मिक भावना राहतात, धर्माची आवड, संस्कार राहतात, त्यांना मद्यपान नष्ट करून टाकते. त्यामुळे मनुष्य महान् पतनाकडे जातो.

लाडू, जिलबी इत्यादी पदार्थ, त्यामध्ये विकृती येईपर्यंत शिळे मानले जात नाहीत. अधिक काळपर्यंत राहिल्यास त्यात विकृती (दुर्गंधीवगैरे) निर्माण झाल्यास त्यांनाही शिळे मानले जाईल.

**उच्छिष्टम्**—जेवणानंतर पात्रात उरलेले अथवा उष्टा हात लागलेले आणि ज्याला गाय, मांजर, कुत्रा, कावळा इत्यादी पशू, पक्ष्यांनी पाहिलेले, वास घेतलेले, खाल्लेले असेल ते सर्व उष्टे मानले जाते.

**अमेध्यम्**—रजवीर्यजनित मांस, मासे, अंडे इत्यादी महान् अपवित्र पदार्थ, जे गतप्राण आहेत, ज्याला केवळ स्पर्श केल्यानेही स्नान करावे लागते.*

**अपि च**—ह्या पदांनी शास्त्रनिषिद्ध अशा सर्व पदार्थांचा संकेत केला आहे. ज्या वर्ण व आश्रमात जे जे पदार्थ निषिद्ध सांगितले आहेत, त्या वर्ण, आश्रमासाठी ते ते निषिद्ध मानले गेले आहेत. जसे मसूर, गाजर, सलगम वगैरे.

**भोजनम् तामसप्रियम्**—असे भोजन तामस माणसाला प्रिय असते. त्यावरुन त्याची निष्ठा ओळखली जाते.

उपर्युक्त भोजनापैकी सात्त्विक भोजनदेखील आसक्ती ठेवून खाल्ले तर ते राजस होते आणि आधाशासारखे आवश्यकतेपेक्षा जास्त खाल्ले तर (अजीर्ण होण्याएवढे) तर ते तामस होते. त्याचप्रमाणे भिक्षुकाला विधी-प्राप्त भिक्षा इत्यादीत आलेले कोरडे, तिखट, शिळे पदार्थ, जे राजस व तामस आहेत, परंतु त्याने भगवंतांना त्याचा नैवेद्य दाखवून भगवन्नामाचे उच्चारण करीत कमी प्रमाणात† खाल्ले तर ते भोजन देखील भाव आणि त्यागाच्या दृष्टीने सात्त्विक होते.

## प्रकरणासंबंधी विशेष गोष्ट

चार श्लोकाच्या या प्रकरणात तीन प्रकारच्या सात्त्विक, राजस, तामस आहाराचे वर्णन दिसून येते. परंतु येथे वास्तविक आहाराचा प्रसंग नाही, तर "आहारी" च्या रुचीचा प्रसंग आहे. म्हणून येथे आहारीच्या रुचीचेच वर्णन झाले आहे. याबद्दल खालील दाखले देता येतील.

(१) सोळाव्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात आलेले "**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः**" ह्या पदांनी अर्जुनाने प्रश्न केला की, मनमाने प्रकाराने श्रद्धापूर्वक काम करणाऱ्यांची श्रद्धा कशी ओळखावी? तर भगवंतांनी या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात श्रद्धेचे तीन प्रकार सांगून तीसऱ्या श्लोकात "**सर्वस्य**" पदाने प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणानुरूप श्रद्धा सांगितली आणि चौथ्या श्लोकात पूज्यानुसार पूजकाची निष्ठा ओळखावी असे सांगितले. सातव्या श्लोकात त्याच "**सर्वस्य**" पदाचा प्रयोग करून भगवान् असे सांगतात की, प्रत्येक मनुष्याला आपापल्या रुचिनुसार तीन प्रकारचे भोजन प्रिय असते—"**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः**" त्या प्रियतेवरुनच मनुष्याची निष्ठा (स्थिती) ओळखता होईल.

"**प्रियः**" शब्द केवल सातव्या श्लोकातच आला नसून आठव्या श्लोकात "**सात्त्विकप्रियाः**" नवव्या श्लोकात "**राजसस्येष्टाः**" आणि दहाव्या श्लोकात "**तामसप्रियम्**" यातही "प्रिय" आणि "इष्ट" शब्द आले आहेत, जे रुचीचे वाचक आहेत. जर येथे आहाराचेच वर्णन असते तर भगवंतांनी प्रिय आणि इष्ट शब्दांचा प्रयोग न करता, हा सात्त्विक आहार आहे, हा राजस आहार आहे, हा तामस आहार आहे. अशा पदांचा प्रयोग केला असता.

(२) दुसरी प्रबल युक्ती ही आहे की, भगवंतांनी सात्त्विक आहारात प्रथम "**आयुः सत्त्वबलारोग्यसुखप्रीति-विवर्धनाः**" पदाने भोजनाचे फल सांगून नंतर भोजनाच्या पदार्थाचे वर्णन केले. कारण सात्त्विक मनुष्य भोजन करणे इत्यादी कोणत्याही कार्यामध्ये विचारपूर्वक प्रवृत्त होतो, म्हणून त्याची दृष्टी सर्वप्रथम त्याच्या परिणामावर जाते.

आसक्ती असल्याकारणाने राजस मनुष्याची दृष्टी सर्वात प्रथम भोजनावरच जाते, म्हणून राजस आहाराच्या वर्णनात प्रथम भोजनाच्या पदार्थांचे वर्णन करून नंतर "**दुःखशोकामयप्रदाः**" पदाने त्याचे फल सांगितले. तात्पर्य, राजस मनुष्याने जर आरंभीच भोजनाच्या परिणामावर विचार केला तर मग त्याला राजस भोजन करण्यात संकोच वाटेल, कारण परिणामी मला दुःख, शोक आणि रोग व्हावा असे कोणीच मनुष्य इच्छित नाही. परंतु आसक्ती असल्या-कारणाने राजस पुरुष परिणामावर विचार करीतच नाही.

सात्त्विक भोजनाचे फल प्रथम आणि राजस भोजनाचे फल नंतर सांगितले गेले. परंतु तामस भोजनाचे फल सांगितलेच गेले नाही. कारण मूढतेमुळे तामस माणूस भोजनावर व त्याच्या परिणामवर विचार करीतच नाही. भोजन न्याययुक्त, शास्त्राज्ञेनुसार आहे किंवा नाही, त्यात आपला अधिकार आहे किंवा नाही आणि परिणामी आपल्या मन, बुद्धीच्या बलाला वाढविण्याला उपयोगी आहे किंवा

* येथे तामस भोजनात "अमेध्य" शब्दाचा प्रयोग करून भगवान् जणू या पदार्थांचे नावही घेऊ इच्छित नाहीत

† कमी प्रमाणात खावे याचा अर्थ असा आहे की, भोजन केल्यानंतर पोटाची आठवण येऊ नये, कारण पोटाची आठवण दोन कारणांनी होते. (१) अधिक खाल्ल्याने आणि (२) फार कमी खाल्ल्याने

नाही, या गोष्टींचा मुळीच विचार न करता तामस मनुष्य पशू-प्रमाणे खाण्यावर तुटून पडतो. तात्पर्य, सात्त्विक भोजन करणारा तर दैवी-संपत्तीला प्राप्त होतो आणि राजस तसेच तामस भोजन करणारा मनुष्य आसुरी-संपत्तीला प्राप्त होतो.

(३) जर भगवंताना येथे आहाराचेच वर्णन करावयाचे असते तर त्यांनी आहाराचा विधी, त्यासाठी कर्माच्या शुद्धी-अशुद्धी यांचे वर्णन केले असते. जसे—

(क) शुद्ध कमाईच्या पैशांनी धान्य इत्यादी खाद्य पदार्थ विकत आणावे. स्वयंपाक घर शुद्ध सारवलेले, स्वच्छ असावे, धूतवस्त्र परिधान करून पवित्रतापूर्वक स्वयंपाक केला जावा. अन्न तयार झाल्यावर भगवंताना त्या अन्नाचा नैवेद्य दाखवावा, नंतर भगवंताचे चिंतन तसेच त्यांच्या नामाचा जप करीत प्रसादबुद्धीने अन्न सेवन करावे—असे भोजन सात्त्विक असते.

(ख) स्वार्थ आणि अभिमान यांनी युक्त होऊन सत्य असत्याचा विचार न करता पैसा कमविणे, स्वाद, शरीराची पुष्टी, भोग भोगण्याचे सामर्थ्य वाढविणे इत्यादी उद्देश ठेवून खाद्य पदार्थ विकत आणणे, जिभेला चटकदार लागणारे व दिसण्यातही सुंदर असणारे, अशा पद्धतीने त्यांना बनविणे आणि आसक्तीपूर्वक खाणे असे भोजन राजस असते.

(ग) असत्य, कपट, चोरी, दरोडे घालून, विश्वासघात इत्यादी कोणत्याही पद्धतीने पैसा कमविणे, शुद्धी-अशुद्धीचा मुळीच विचार न करता मांस, अंडे इत्यादी पदार्थ विकत आणणे विधि-विधानाकडे मुळीच दृष्टी न ठेवता स्वयंपाक तयार करणे आणि हात पाय इत्यादी न धुता, चप्पल-जोडे घालूनच अशुद्ध वातावरणात त्याचे सेवन करणे हे भोजन तामस असते.

परंतु भगवंतानी येथे केवळ सात्त्विक, राजस आणि तामस पुरुषांना प्रिय वाटणारे खाद्य पदार्थांचे वर्णन केले आहे, ज्यामुळे त्यांच्या रुचीची ओळख होईल.

(४) याशिवाय गीतेमध्ये जेथे कोठे आहाराचा विषय आला आहे, तेथे-तेथे आहारीचेच वर्णन आले आहे. जसे "**नियताहाराः**" (४।३०) पदात नियमित आहार करणाऱ्याचे, "**नात्यश्नतस्तु**" आणि "**युक्ताहारविहारस्य**" (६।१६-१७) पदांमध्ये अधिक खाणाऱ्याचे आणि नियत खाणाऱ्याचे, "**यदश्नासि**" (९।२७) पदात भोजनाचे पदार्थ भगवंतांना अर्पण करणाऱ्याचे आणि "लघ्वाशी" (१८।५२) पदात अल्प भोजन करणाऱ्याचे वर्णन झाले आहे.

त्याचप्रमाणे या अध्यायाच्या सातव्या श्लोकात "**यज्ञस्तपस्तथा दानम्**" पदांत आलेले "**तथा**" (तसेच) पद हे सांगत आहे की, जी माणसे यज्ञ, तप, ज्ञान इत्यादी कार्य करतात तेही आपापल्या (सात्त्विक, राजस व तामस) रुचिनुसारच करत असतात. पुढे अकराव्या श्लोकापासून बावीसाव्या श्लोकापर्यंत जे प्रकरण आहे, त्यातही यज्ञ, तप आणि दान करणाऱ्यांच्या स्वभावाचेच वर्णन झाले आहे.

## भोजनासंबंधी आवश्यक विचार

उपनिषदांत असे आले आहे की, जसे अन्न असते तसेच मन बनते-"**अन्नमयं हि सौम्य मनः**" (छान्दोग्य ६।५।४) अर्थात् अन्नाचा परिणाम मनावर होतो. अन्नाच्या सूक्ष्म सारभागाने मन (अंतःकरण) बनते, दुसऱ्या क्रमांकाच्या भागापासून वीर्य, तीसऱ्या क्रमांकाच्या भागापासून रक्त इत्यादी आणि चौथ्या क्रमांकाच्या स्थूल भागापासून मल बनतो, तो बाहेर पडतो. म्हणून मनाला शुद्ध बनविण्यासाठी भोजन शुद्ध, पवित्र असले पाहिजे. भोजनाच्या शुद्धीने मनाची (अंतःकरण) शुद्धी होत असते "**आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः**" (छान्दोग्य० २।२६।२) जेथे भोजन केले जाते तेथील स्थान, वातावरण, दृश्य, तसेच ज्याच्यावर बसून भोजन करतो, ते आसनही शुद्ध आणि पवित्र असले पाहिजे. कारण भोजन करतेवेळी प्राण जेव्हा अन्न ग्रहण करतात, तेव्हा ते शरीराच्या रोमछिद्रांमधून आसपासच्या परमाणूंना सुद्धा खेचून घेत अन्नग्रहण करतात. म्हणून तेथील स्थान, वातावरण इत्यादी जसे असतील तसेच प्राण परमाणू खेचून घेतील आणि त्यानुसारच मन बनेल. स्वयंपाक करणाऱ्याचे भाव, विचारसुद्धा शुद्ध सात्त्विक असावेत.

भोजनापूर्वी दोन्ही हात, दोन्ही पाय, मुख हे पाचही शुद्ध पाण्याने धुवावेत. मग पूर्व किंवा उत्तरेकडे मुख करून शुद्ध आसनावर बसून भोजनाचे सर्व पदार्थ "**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति। तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥**" (९।२६) हा श्लोक म्हणून भगवंतांना अर्पण करावेत. अर्पणानंतर डाव्या हातात पाणी घेऊन "**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥**" (४।२४) हा श्लोक म्हणून आचमन करावे आणि भोजनाचा पहिला घास भगवंताचे नाव घेऊन मुखात घालावा. प्रत्येक घास चावताना "**हरे राम हरे राम राम राम हरे हरे। हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे॥**" हा मंत्र दोन वेळा म्हणून किंवा आपल्या इष्ट देवतेचे नाव घेत घास चावावा व गिळावा. या मंत्रात एकूण सोळा नाम आहेत आणि दोन वेळा मंत्र म्हटल्यास बत्तीस नाम होतात. आपल्या मुखातही बत्तीसच दात आहेत. म्हणून (मंत्राच्या प्रत्येक नावाबरोबर) बत्तीस वेळा घास चावल्याने ते भोजन सुपाच्य आणि आरोग्यदायक होते आणि

थोड्या अन्नानेच तृप्ती होते. तसेच त्याचा रसही चांगला बनतो आणि त्या बरोबरच भोजनसुद्धा भजन होते.

भोजन करतेवेळी प्रत्येक घास घेताना नाम जप केल्यास अन्नदोषही दूर होतात.*

जे लोक ईर्ष्या, भय आणि क्रोधयुक्त आहेत तसेच लोभी आहेत आणि रोग तसेच दैन्यपीडित आणि द्वेषी आहेत, त्यांनी केलेले भोजन चांगले पचत नाही. अर्थात् त्यांना अजीर्ण होते. †म्हणून मनुष्याने भोजन करतेवेळी मनाला शांत आणि प्रसन्न ठेवावे. मनात काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादी दोषांच्या वृत्ती येऊ देऊ नयेत. जर त्या कधी आल्या तर त्यावेळी भोजन करू नये. कारण वृत्तींचा परिणाम भोजनावर होतो आणि त्यानुसार मन बनते. असेही ऐकण्यात आले आहे की, फौजी लोक जेव्हा गायीचे दूध काढतात तेव्हा अगोदर वासरू सोडतात व त्या वासरामागे कुत्रा सोडतात. आपल्या वासरामागे कुत्र्याला आलेले पाहून गाय जेव्हा क्रोधित होते, तेव्हा वासराला आणून बांधतात आणि मग धार काढतात. ते दूध फौजी लोकांना पाजले जाते, त्यामुळे ते लोक भयंकर क्रूर बनतात.

त्याचप्रमाणे दुधाचा परिणाम प्राण्यावरही होतो. एकदा कोणीतरी परीक्षा घेण्यासाठी काही घोड्यांना म्हशीचे दूध आणि काही घोड्यांना गायीचे दूध पाजून त्यांना तयार केले. एके दिवशी सर्व घोडे कोठेतरी जात होते. रस्त्यात नदी लागली. म्हशीचे दूध प्यालेले घोडे त्या नदीत बसले आणि गायीचे दूध प्यालेले घोडे नदी पार करून गेले. त्याचप्रमाणे बैल आणि रेड्याचे परस्पर युद्ध करविले तर रेडा बैलाला मारील. परंतु दोघांना गाडीला जुंपले तर रेडा उन्हाचे वेळी जीभ बाहेर काढील आणि बैल उन्हातही चालत राहील. कारण म्हशीच्या दूधात सात्त्विक बल नसते, परंतु गायीच्या दूधात सात्त्विक बल असते.

ज्याप्रमाणे प्राण्यांच्या वृत्तींचा पदार्थांवर परिणाम होतो, त्याचप्रमाणे प्राण्यांच्या दृष्टीचाही परिणाम होतो. वाईट माणसाची किंवा भुकेल्या कुत्र्याची दृष्टी भोजनावर पडली तर ते अन्न अपवित्र होते. मग ते अन्न पवित्र कसे होईल? भोजनावर त्याची दृष्टी पडली तर त्याला पाहून मनात प्रसन्न व्हावे की, भगवंतच त्या रूपाने आले आहेत असे समजून त्याला अन्नातील थोडा भाग प्रथम द्यावा आणि भोजन करवावे. त्याला दिल्यानंतर उरलेले शुद्ध अन्न स्वतः खावे म्हणजे दृष्टीदोष नाहीसा होऊन ते अन्न पवित्र होते.

दुसरी गोष्ट, लोक वासराला पोटभर दूध पिऊ न देता सर्व दूध स्वतःच काढून घेतात. ते दूध पवित्र राहत नाही कारण त्यात वासराचा हक्क असतो. वासराला पोटभर दूध पिऊ द्यावे, त्यानंतर जेवढे दूध निघेल, मग ते पावभर का असेना, फार पवित्र असते.

भोजन करणारे आणि करविणारे यांच्या भावांचाही भोजनावर परिणाम होतो. जसे

(१) भोजन करणाऱ्यापेक्षा भोजन करविणाऱ्याची जितकी अधिक प्रसन्नता असेल, ते भोजन उत्तम दर्जाचे मानले जाईल (२) भोजन करविणारा तर मोठ्या प्रसन्नतेने भोजन करवितो परंतु भोजन करणाऱ्याने "फुकटात भोजन मिळाले, आपले इतके पैसे वाचले, याने शरीर पुष्ट होईल" असा स्वार्थी भाव ठेवला तर ते जेवण मध्यम दर्जाचे होते. (३) भोजन करविणाऱ्याचा हा भाव असेल की, "हा घरी आला आहे तर याला जेवण घालावेच लागेल, भोजन तयार करावे लागेल, खर्च करावा लागेल" आणि भोजन करणाऱ्यातही स्वार्थभाव असेल तर ते भोजन निकृष्ट दर्जाचे होईल.

या विषयात गीतेने सिद्धांतरूपाने म्हटले आहेकी "**सर्वभूतहिते रताः**" (५।२५; १२।४) तात्पर्य, ज्यांचा संपूर्ण प्राण्यांविषयी हिताचा भाव जितका अधिक असेल, त्याचे पदार्थ, क्रिया इत्यादी तितकेच पवित्र होतील.

भोजनाच्या शेवटी आचमन घेतल्यानंतर हे श्लोक म्हणावेत—

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्॥**

(३।१४-१५)

नंतर भोजन पचविण्यासाठी "**अहं वैश्वानरो भूत्वा**" (१५।१४) श्लोक म्हणत मध्यमा ह्या बोटाने नाभी हळू हळू फिरवावी.

***संबंध**—प्रथम यजन-पूजन आणि भोजनद्वारा जी श्रद्धा सांगितली, तिच्यामुळे शास्त्रविधीचा अज्ञानाने त्याग करणाऱ्यांच्या स्वाभाविक निष्ठेची-रुचीची तर ओळख होते, परंतु माणसे व्यापार, शेती इत्यादी जीविकेची कार्य करतात, अथवा शास्त्रविहित*

---

* कवले कवले कुर्वन् रामनामानुकीर्तनम्। यः कश्चित् पुरुषोऽश्नाति सोऽन्नदोषैर्न लिप्यते॥

† ईर्ष्याभयक्रोधसमन्वितेन लुब्धेन रुग्दैन्यनिपीडितेन। विद्वेषयुक्तेन च सेव्यमानमन्नं न सम्यक् परिपाकमेति॥ (भाव प्रकाश-दिनचर्या-प्रकरण ५।२२८)

*यज्ञादी शुभ कर्म करतात, त्यांच्या रुचीची स्वाभाविक ओळख कशी होईल? हे सांगण्यासाठी यज्ञ, तप आणि दान यांच्या तीन, तीन प्रकाराचे प्रकरण आरंभ करतात.*

**अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः॥ ११॥**

**यष्टव्यम्, एव** = यज्ञ करणेच कर्तव्य आहे
**इति** = —अशाप्रकारे
**मनः** = मन
**समाधाय** = समाधान करून (संतुष्ट करून)
**अफलाकाङ्क्षिभिः** = फलेच्छारहित मनुष्यांद्वारा
**यः** = जो
**विधिदृष्टः** = शास्त्रविधीने नियत असा
**यज्ञः** = यज्ञ
**इज्यते** = केला जातो,
**सः** = तो
**सात्त्विक** = सात्त्विक असतो.

*व्याख्या*— **यष्टव्यमेवेति**—जर मनुष्यशरीर मिळाले आहे आणि आपले कर्तव्य करण्याचा अधिकारही प्राप्त झाला आहे तर आपल्या वर्णाश्रमाप्रमाणे शास्त्राज्ञेनुसार केवळ यज्ञ करणे माझे कर्तव्य आहे. "**एव इति**" हे दोन अव्यय लावण्याचे तात्पर्य, याशिवाय दुसरा कोणताही भाव ठेवू नये अर्थात् या यज्ञाने या लोकी आणि परलोकी काय मिळेल? त्यामुळे मला कोणता लाभ होईल? असा भावही राहू नये. केवळ कर्तव्य म्हणून करावे.

जर त्यापासून काही मिळविण्याची आशा ठेवावयाची नाही तर मग (फलेच्छेचा त्याग करून) यज्ञ करण्याची काय आवश्यकता आहे? याच्या उत्तरात भगवान् म्हणतात "**मनः समाधाय**" अर्थात् "यज्ञ करणे माझे कर्तव्य आहे" असे मनाचे समाधान करून यज्ञ केला पाहिजे.

**अफलाकाङ्क्षिभिः**—मनुष्य फलाची इच्छा करणारा नसावा अर्थात् लोक परलोकात मला या यज्ञाचे अमुक फल मिळावे, असा भाव ठेवणारा नसावा.

**यज्ञो विधिदृष्टो य इज्यते**—शास्त्रात जसा विधी सांगितला आहे त्यानुसारच यज्ञ केला जावा. अशा प्रकारे जो यज्ञ केला जातो तो सात्त्विक असतो. "**स सात्त्विकः**".

## सात्त्विकतेचे तात्पर्य

सात्त्विकतेचे तात्पर्य काय आहे? त्यावर आता थोडा विचार करू. "**यष्टव्यम्**"* "केवळ यज्ञ करणे कर्तव्य आहे" असा जेव्हा उद्देश राहतो, तेव्हा त्या यज्ञाशी आपला संबंध जोडला जात नाही. परंतु जेव्हा कर्त्यात "वर्तमानात मान, आदर, सत्कार इत्यादी मिळावेत, मृत्यूनंतर स्वर्गलोक मिळावा तसेच पुढील जन्मात धनादी पदार्थ मिळावेत" अशा प्रकारच्या इच्छा राहिल्या तर त्याचा त्या यज्ञाशी संबंध जोडला जाईल. तात्पर्य, फलाची इच्छा केली तरच यज्ञाशी संबंध जोडला जातो. केवळ कर्तव्यपालन समजून यज्ञ करण्याने त्याच्याशी संबंध जोडला जात नाही, उलट संबंध-विच्छेद होतो आणि (स्वार्थ आणि अभिमान न राहिल्यामुळे) कर्त्याची अहंता शुद्ध होते.

यात एक मोठी मार्मिक गोष्ट अशी आहे की, कोणतेही कर्म करताना कर्त्याचा कर्माशी संबंध राहतो. कर्म कर्त्याहून वेगळे राहत नाही. कर्म कर्त्याचे चित्र असते अर्थात् जसा कर्ता असेल तसेच कर्म होते. याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे. "**यो यच्छ्रद्धः स एव सः**" अर्थात् जो ज्या श्रद्धेचा असतो तसेच त्याचे स्वरूप असते आणि तसेच (श्रद्धेनुसार) त्याच्याकडून कर्म होते. तात्पर्य कर्त्याचा कर्माशी संबंध राहतो आणि कर्माशी संबंध असल्यानेच कर्त्याचे बंधन होते. केवळ कर्तव्य समजून कर्म करण्याने कर्त्याचा कर्माशी संबंध राहत नाही अर्थात् कर्ता मुक्त होतो.

केवळ कर्तव्य समजून कर्म करणे काय आहे? आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही, सामुग्रीशी माझा काहीही संबंध नाही, माझा देश, काळादीशीही कोणताही संबंध नाही, केवळ मनुष्य असल्याच्या नात्याने जे कर्तव्य प्राप्त झाले आहे, ते करावयाचे आहे. असा भाव ठेवल्याने कर्ता फलाकांक्षी होणार नाही आणि कर्माचे फल कर्त्याला बांधणार नाही अर्थात् यज्ञक्रिया आणि यज्ञफलाशी कर्त्याचा संबंध राहणार नाही. गीता म्हणते "**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि**" (५।११) अर्थात् करण (शरीर, इंद्रिये इत्यादी) उपकरण (यज्ञ करण्यात उपयोगी येणारी सामुग्री) आणि अधिकरण (स्थान) इत्यादी कोणाशीही आपला संबंध नसावा.

* जे करण्यायोग्य आहे, जे आपल्या सामर्थ्यानुरूप आहे, जे अवश्य केलेच पाहिजे आणि जे केल्याने उद्देशाची सिद्धी निश्चितपणे होते, ते "कर्तव्य" असते. तेच कर्तव्य यज्ञात "यष्टव्य" आणि दानात "दातव्य" असते.

यज्ञक्रियेचा आरंभ होतो आणि समाप्ती होते। तसेच त्याच्या फलाचा आरंभ होतो आणि समाप्ती होते. क्रिया आणि फल दोन्हीही उत्पन्न होऊन नष्ट होणारे आहेत आणि स्व (आत्मा) नित्य-निरंतर राहणारा आहे, परंतु हा (स्व) क्रिया आणि फलाशी आपला संबंध मानतो. या मानलेल्या संबंधाला हा जोपर्यंत सोडत नाही, तोपर्यंत हा जन्म-मरणरूप बंधनात पडून राहतो. "**फले सक्तो निबध्यते**" (५।१२)

एक विलक्षण गोष्ट अशी आहे की, गीतेत जो सत्त्वगुण सांगितलेला आहे, तो संसाराशी संबंध-विच्छेद करून परमात्म्याकडे घेऊन जाणारा असल्यामुळे "सत्" अर्थात् निर्गुण होतो.* दैवी-संपत्तीतही जितके गुण आहेत ते सर्व सात्त्विकच आहेत. परंतु दैवी-संपत्तीयुक्त मनुष्य जेव्हा सत्त्वगुणाच्याही पलीकडे जाईल अर्थात् जेव्हा संपूर्णपणे गुणसंगरहित होईल, तेव्हाच तो परमात्म्याला प्राप्त होईल.

**अभिसन्धाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत्।**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्॥१२॥**

**तु** = परंतु
**भरतश्रेष्ठ** = हे भरतश्रेष्ठ अर्जुन!
**यत्** = जो
**फलम्** = फलाच्या
**अभिसन्धाय, एव** = इच्छेनेच
**इज्यते** = केला जातो
**च** = अथवा
**दम्भार्थम् अपि** = दम्भासाठीच (दिखावटीपणा-साठीच) (केला जातो),
**तम्** = तो
**यज्ञम्** = यज्ञ (तू)
**राजसम्** = राजस
**विद्धि** = समज.

*व्याख्या*— **अभिसन्धाय तु फलम्**—फल अर्थात् इष्टाची प्राप्ती आणि अनिष्टाच्या निवृत्तीची कामना ठेवून जो यज्ञ केला जातो, तो राजस होतो.

"या लोकी आपल्याला धन-वैभव मिळावे, स्त्री, पुत्र, परिवार चांगला मिळावा, नोकर चाकर, गाय-म्हैस इत्यादी सुद्धा आपल्या अनुकूल मिळावेत, आपले शरीर निरोगी रहावे, आपला आदर-सत्कार, मान-सन्मान, प्रसिद्धी व्हावी तसेच मृत्यूनंतरही आपल्याला स्वर्गादी लोकांचे दिव्य भोग मिळावेत" इत्यादी इष्ट प्राप्तीच्या कामना आहेत.

"आपले वैरी नष्ट व्हावेत, संसारात आपला अपमान, बेइज्जत, तिरस्कार इत्यादी कधीही होऊ नये, आपल्यासमोर प्रतिकूल परिस्थिती कधीही येऊच नये" इत्यादी अनिष्ट निवृत्तीच्या कामना आहेत.

**दम्भार्थमपि चैव यत्**—लोकांनी आपल्याला खरोखर सद्गुणी, सदाचारी, संयमी, तपस्वी, दानी, धर्मात्मा, याज्ञिक इत्यादी समजावे, त्यामुळे संसारात आपली प्रसिद्धी व्हावी अशा दिखाऊपणाने जो यज्ञ केला जातो तो राजस म्हटला जातो. अशा प्रकारचे दिखाऊ यज्ञ करणाऱ्यात "**यक्ष्ये दास्यामि**" (१६।१५) आणि "**यजन्ते नामयज्ञैस्ते**" (१६।१७) इत्यादी सर्वच गोष्टी विशेषतेने येतात.

**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्**—अशा प्रकारे फलाची कामना आणि दम्भ (दिखाऊपणा) यासाठी केला जाणारा यज्ञ राजस होतो.

जो यज्ञ कामनापूर्तीसाठी केला जातो, त्यात शास्त्र-विधीची मुख्यता राहते. कारण यज्ञविधी आणि क्रियेत जर

* श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधाच्या पंचवीसाव्या अध्यायात जेथे तामस, राजस आणि सात्त्विक—या तीन गुणांचे वर्णन झाले आहे, तेथे त्याबरोबर आणखी एक "निर्गुण" म्हटले आहे. परंतु गीतेत तीनच गुण सांगितले गेले आहेत. जर दोन्हीचे वक्ते एक भगवान् श्रीकृष्णच आहेत तर मग असा फरक का?

गीतेचा जो सात्त्विक भाव आहे. त्यात भगवंतांनी "यष्टव्यम्" १७।११, "दातव्यम्" (१७।२०), "कार्यमित्येव" (१८।९) इत्यादी पदे सांगितली आहेत. यांना सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, ज्या कर्त्याचा उद्देश केवल यज्ञ करणे, केवळ दान देणे आणि केवळ कर्तव्य करणे असा राहतो, त्याचा कर्म आणि कर्मफलाशी, प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्याशी किंचिन्मात्रही संबंध राहत नाही अर्थात् सात्त्विक यज्ञ, दान इत्यादीसुद्धा "निर्गुण" होतात.

सतराव्या अध्यायाच्या शेवटी परमात्म्याच्या "ॐ तत् सत्" या तीन नावाच्या वर्णनात "सत्" शब्दाची व्याख्या करताना भगवंतांनी सांगितले की, त्या परमात्म्याच्या निमित्ताने जितकी कर्म केली जातात, ती सर्व "सत्" (निर्गुण) होतात— "कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते" (१७।२७) तात्पर्य, कर्मयोग्याचे कर्म कर्मफलाशी संबंध-विच्छेद झाल्याने आणि भक्तियोग्याच्या कर्मांचा भगवंताशी संबंध जोडला गेल्याने त्यांची सर्व कर्म "निर्गुण" होतात. अशा प्रकारे दोन्ही गोष्टी एकातच आल्याने गीतेत निर्गुणाचे वेगळे वर्णन आलेले नाही.

गीतेत जेथे सत्त्वगुणाला अनामय दर्शविले आहे, तेथे सत्त्वगुणाने बंधन होत असल्याबद्दलही सांगितले आहे (१४।६) आणि म्हटले आहे की, सत्त्वगुणात स्थित पुरुष ऊर्ध्वलोकात जातात (१४।१८) याचे तात्पर्य बंधन सत्त्वगुणाने होत नाही, तर त्याच्या संगाने बंधन होते—"सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ" (१४।६) आणि "कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु" (१३।२१) त्याचप्रमाणे सत्त्वगुणात आपली स्थिती मानणे "सत्त्वस्थाः" (१४।१८) सुद्धा बंधनकारक आहे.

काही उणीव राहीली तर त्या यज्ञापासून प्राप्त होणाऱ्या फलातही उणीव येईल. त्याचप्रमाणे जर यज्ञाच्या विधी आणि क्रियेत विपरीतता आली तर त्याचे फल देखील विपरीत मिळेल अर्थात् तो यज्ञ सिद्ध न होता उलट यज्ञ-कर्त्याला घातक होईल.

परंतु जो यज्ञ केवल दिखाऊपणासाठी केला जातो, त्यात शास्त्रविधीची परवा केली जात नाही.

येथे "**विद्धि**" क्रिया देण्याचे तात्पर्य, हे अर्जुन! सांसारिक आसक्तीच (कामना) जन्म-मरणाला कारण आहे. म्हणून ह्याविषयी तुला विशेष सावध रहावयाचे आहे.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात आलेल्या 'यत्' पदाने हा भाव निघतो की, फलेच्छा आणि दंभासाठी जे काही यज्ञ, दान, तप इत्यादी कर्म केले जातील, ते सर्व राजस कर्म समजावे.

**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम्।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **विधिहीनम्** | = शास्त्रविधीहीन | **अदक्षिणम्** | = दक्षिणाविना (आणि) | **यज्ञम्** | = यज्ञाला |
| **असृष्टान्नम्** | = अन्नदानानेरहित, | **श्रद्धाविरहितम्** | = श्रद्धाविना केल्या जाणाऱ्या | **तामसम्** | = तामस |
| **मन्त्रहीनम्** | = मंत्राविना, | | | **परिचक्षते** | = म्हणतात. |

*व्याख्या*— **विधिहीनम्**—वेगवेगळ्या यज्ञांचे वेगवेगळे विधी असतात आणि त्यानुसार यज्ञकुंड, स्रुवा इत्यादी पात्र, बसण्याची दिशा, आसन इत्यादीचा विचार त्यात सांगितलेला असतो. वेगवेळ्या देवतांची वेगवेगळी सामुग्री असते. जसे देवीच्या यज्ञामध्ये लाल वस्त्र आणि लाल सामुग्री असते, परंतु तामस यज्ञात या विधीचे पालन होत नाही, उलट उपेक्षापूर्वक त्याग केला जातो.

**असृष्टान्नम्**—तामस माणसे जे द्रव्ययज्ञ करतात, त्यात ब्राह्मणांना अन्नदान दिले जात नाही. तामस माणसांचा असा भाव असतो की, फुकटात खावयाला मिळाल्यास ब्राह्मण आळशी होतील, काम धंदा करणार नाहीत.

**मन्त्रहीनम्**—वेद आणि वेदानुकूल शास्त्रे यात असलेल्या मंत्रानीच द्रव्ययज्ञ केला जातो. परंतु तामस यज्ञात वैदिक आणि शास्त्रोक्त मंत्रांनी यज्ञ केला जात नाही. कारण तामस माणसांचा असा भाव असतो की, केवळ आहुती दिल्यानेच यज्ञ होतो, सुगंध पसरून वाईट परमाणू नष्ट होतात, मग मंत्रांची काय आवश्यकता आहे? इत्यादी.

**अदक्षिणम्**—तामस यज्ञात दान केले जात नाही. कारण तामस माणसांचा असा भाव असतो की, आपण अग्नीत आहुती दिल्या आणि ब्राह्मणांना चांगले भोजन दिले, तर आता दक्षिणा देण्याची काय आवश्यकता राहिली? जर आपण त्यांना दक्षिणा दिली तर ते आळशी, प्रमादी होतील, पुरुषार्थहीन होतील, त्यामुळे जगात बेकारी पसरेल. दुसरी गोष्ट ज्या ब्राह्मणांना दक्षिणा मिळते, ते काही कमाईच करीत नाहीत. म्हणून ते पृथ्वीला भाररूप होतील इत्यादी. ती तामस माणसे हा विचारच करीत नाहीत की, ब्राह्मणादिकांना अन्नदान, दक्षिणा इत्यादी न दिल्याने ते प्रमादी होवोत अथवा न होवोत परंतु शास्त्रविधीचा, आपल्या कर्तव्यकर्माचा त्याग केल्याने आपण प्रमादी झालोच.

**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते**—अग्नीत आहुती देण्याच्या विषयात तामस माणसांचा हा भाव राहतो की, अन्न, तूप, जव, तांदूळ, नारळ, इत्यादी तर मनुष्याच्या निर्वाहाच्या वस्तू आहेत. अशा वस्तूंना अग्नीत जाळून टाकणे किती मूर्खपणा आहे?* आपल्या प्रसिद्धी, मान-सन्मानासाठी ते यज्ञही करतात, पण शास्त्रविधी, अन्नदान, मंत्र व दक्षिणा या विरहित असा त्यांचा यज्ञ असतो. त्यांचा शास्त्र, शास्त्रोक्त

* जेव्हा शेतात नांगर चालविणारा शेतकरी उत्तमोत्तम बीज जमीनीत पेरतो आणि योग्य कालावधीनंतर त्या बीजापासून कित्येक पटीने अधिक धान्य उत्पन्न होते, तेव्हा मग शास्त्रीय मंत्रांच्या उच्चारणपूर्वक वस्तूंचे हवन करणे कसे व्यर्थ जाईल? मातीत पेरलेले बीज तर आधिभौतिक आहे, कारण पृथ्वी जड आहे परंतु शास्त्रविधिसहित अग्नीत दिली गेलेली आहुती आधिदैविक आहे, कारण देवता चेतन आहेत. म्हणून त्या देवतांना दिलेली आहुती पावसाच्या रूपाने फार मोठे काम करते. मनूजीने म्हटले आहे—

अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते। आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः॥ (मनुस्मृति३।७६)

अर्थात् अग्नीमध्ये दिलेली आहुती सूर्याच्या किरणांना पुष्ट करते। आणि त्या पुष्ट झालेल्या किरणांनी वर्षा होते (ही गोष्ट भौतिक वैज्ञानिकसुद्धा मानू लागले आहेत).

सर्व जीव अन्नापासून उत्पन्न होतात आणि अन्न पाण्यापासून उत्पन्न होते "अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः" (३।१४) म्हणून सृष्टीत पाणीच मुख्य आहे. पावसाचा वर्षाव होण्यात "यज्ञ" च मुख्य कारण आहे—"यज्ञाद्भवति पर्जन्यः". (३।१४)

मंत्र आणि शास्त्रविधी तसेच शास्त्रोक्त विधीपूर्वक केल्या गेलेल्या यज्ञक्रिया यांच्यावर आणि त्यांच्या पारलौकिक फलावरही श्रद्धा-विश्वास नसतो. कारण त्यांच्यात मूढता असते. त्यांच्यात स्वतःची अक्कल नसते आणि दुसऱ्यांनी सांगितले तर ते मानत नाहीत.

या तामस यज्ञात **"यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते काम कारतः"** (१६।२३) आणि **"अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्"** (१७।२८) हे दोन्ही भाव असतात. म्हणून त्यांना इहलोक व परलोकातील इच्छित फल मिळत नाही—**"न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्"**, **"नच तत्प्रेत्य नो इह."** तात्पर्य त्यांना उपेक्षापूर्वक केल्या गेलेल्या शुभ कर्माचे इच्छित फल तर मिळणार नाही, परंतु अशुभ कर्माचे फल (अधोगती) मात्र मिळेलच **"अधो गच्छन्ति तामसाः"** (१४।१८) कारण अशुभ फलात अश्रद्धाच हेतू असते आणि ते अश्रद्धेनेच शास्त्रविरुद्ध आचरण करतात म्हणून त्याचा दंड तर त्यांना मिळेलच.

या यज्ञांमध्ये कर्ता, ज्ञान, क्रिया, धृती, बुद्धी, संगती, शास्त्र, खाणे-पिणे इत्यादी जर सात्त्विक असतील, तर तो यज्ञ सात्त्विक होईल, जर राजस असतील तर तो यज्ञ राजस होईल आणि जर तामस असतील तर तो यज्ञ तामस होईल.

***संबंध**—अकराव्या, बाराव्या आणि तेराव्या श्लोकात क्रमाने सात्त्विक, राजस आणि तामस यज्ञाचे वर्णन करून आता पुढील तीन श्लोकांत क्रमाने शारीरिक, वाचिक आणि मानसिक तपाचे वर्णन करीत आहेत (यांचे सात्त्विक, राजस व तामस भेद पुढे करतील).*

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते॥१४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देवद्विजगुरु-प्राज्ञपूजनं** | = देवता, ब्राह्मण, गुरुजन आणि जीवन्मुक्त महापुरुष यांचे यथायोग्य पूजन करणे, | **शौचम्** | = शुद्धता ठेवणे, | **अहिंसा** | = हिंसा न करणे (हे) |
| | | **आर्जवम्** | = सरळता, | **शारीरम्** | = शरीरसंबंधी |
| | | **ब्रह्मचर्यम्** | = ब्रह्मचर्य पालन करणे | **तपः** | = तप |
| | | **च** | = आणि | **उच्यते** | = म्हटले जाते. |

*व्याख्या*— **देवद्विजगुरुप्राज्ञपूजनम्**—येथे "देव" शब्द मुख्यतः विष्णू, शंकर, गणेश, शक्ती आणि सूर्य या पाच ईश्वरकोटी देवतांसाठी आला आहे. या पाचापैकी जे आपले इष्ट आहे, ज्याच्यावर अधिक श्रद्धा आहे, त्याचे निष्काम-भावाने पूजन केले पाहिजे.*

बारा आदित्य, आठ वसू, अकरा रुद्र आणि दोन अश्विनीकुमार ह्या तेहतीस शास्त्रोक्त देवतासुद्धा "देव" शब्दाच्या अंतर्गत येतात. यज्ञ, तीर्थ, व्रत इत्यादीत दीप मालिकादी विशेष पर्व, जातकर्म, चूडाकर्म, यज्ञोपवीत, विवाह इत्यादी संस्कार प्रसंगी ज्या देवतांचे पूजन करण्याचे विधान शास्त्रात आहे, त्या सर्व देवतांनाही "देव" शब्दाच्या अंतर्गत समजावे. या देवतांचे यथावसर पूजन करण्याची शास्त्राज्ञा आहे. म्हणून आपल्याला केवळ शास्त्रमर्यादा सुरक्षित ठेवण्यासाठी, आपले कर्तव्य समजून निष्काम-भावाने यांचे पूजन करावयाचे आहे.अशा भावनेने या देवतांचे-सुद्धा यथावसर पूजन केले पाहिजे. तात्पर्य, शास्त्रात ज्या ज्या तिथी, वार, नक्षत्र, दिवस इत्यादीच्या मुहूर्तावर ज्या ज्या देवतांचे पूजन करण्याचे विधान केले आहे, त्या त्या तिथी इत्यादींच्या दिवशी त्या त्या देवतांचे पूजन केले पाहिजे.

**द्विज**—हा शब्द ब्राह्मण, क्षत्रिय, आणि **वैश्य** या तिघांचा वाचक आहे, परंतु येथे पूजनाचा विषय असल्यामुळे याला केवळ ब्राह्मणाचाच वाचक समजावे, क्षत्रिय आणि वैश्याचा वाचक समजू नये.

ज्यांच्याकडून आपल्याला शिक्षण मिळते. असे आपले माता-पिता, वृद्धमंडळी, कुलाचार्य, अध्यापक आणि आश्रम, अवस्था, विद्या, इत्यादींनी आपल्यापेक्षा श्रेष्ठ असलेल्या सर्वांना "गुरू" शब्दाच्या अंतर्गत समजावे.

द्विज (ब्राह्मण) आणि आपले माता-पिता, आचार्य इत्यादी गुरुजनांच्या आज्ञेचे पालन करणे, त्यांची सेवा करणे आणि त्यांची प्रसन्नता प्राप्त करणे, तसेच पत्र-पुष्प आरती इत्यादीने त्यांची पूजा करणे—हे सर्व त्यांचे पूजन आहे.

येथे **"प्राज्ञ"** शब्द जीवन्मुक्त महापुरुषासाठी आला

* यातही वैष्णव भगवान् विष्णूला, शैव भगवान् शिवाला, गाणपत्य भगवान् गणेशाला, शाक्त भगवती शक्तीला आणि सौर भगवान् सूर्याला सर्वोपरी ईश्वर मानतात. म्हणून या पाचापैकी आपल्या श्रद्धाभक्तीनुसार आपले इष्ट तर सर्वोपरी ईश्वर राहील आणि सर्व देवता अन्य राहतील.

आहे. जर तो वर्ण आणि आश्रम ह्यात श्रेष्ठ असता तर "द्विज" पदात आला असता आणि शरीराच्या संबंधाने (जन्म आणि विद्येत) मोठा असता तर "गुरू" पदात आला असता. म्हणून जो वर्णाश्रमाने उच्च नाही आणि गुरू शब्दातही बसत नाही अशा तत्त्वज्ञ महापुरुषांना येथे "प्राज्ञ" म्हटले गेले आहे. अशा जीवन्मुक्त महापुरुषांच्या वचनांचा व सिद्धांताचा आदर करून त्यांच्याप्रमाणे आपले जीवन बनविणे हेच वास्तविक त्यांचे पूजन आहे. खरे पाहिले तर द्विज आणि गुरू सांसारिक दृष्टीने आदरणीय-पूजनीय आहेत. परंतु प्राज्ञ (जीवन्मुक्त) आध्यात्मिक दृष्टीने आदरणीय पूजनीय आहेत. म्हणून जीवन्मुक्तांचा अंतः करणातून आदर केला पाहिजे कारण केवळ बाह्य दृष्टीने केलेला आदर, आदर नव्हे, तर अंतःकरणातून केलेला आदरच वास्तविक आदर आहे, पूजन आहे.

**शौचम्**—पाणी, माती इत्यादीने शरीराला पवित्र करण्याचे नाव "शौच" आहे. शारीरिक शुद्धीने अंतः-करणाची शुद्धी होत असते. "**शौचात्स्वाङ्गजुगुप्सा परैरसंसर्गः**।" (योगदर्शन २।४०)

शौचाने आपल्या शरीराविषयी अशी घृणा होईल की, आपण या शरीराला रात्रंदिवस इतके स्वच्छ करीत राहतो, तरीही यातून मल, मूत्र, घाम, शेंबूड, लाळ, थुंकी, डोळे आणि कानाचा मळ इत्यादी घाणेरडे पदार्थ निघतच राहतात. हे शरीर हाडे, मांस, मज्जा इत्यादी घाणेरड्या (अपवित्र) पदार्थांचे बनलेले आहे. ह्या हाडा, मांसाच्या थैल्यात एक तोळाभर देखील पवित्र, निर्मळ, शुद्ध आणि सुगन्धयुक्त वस्तू नाही. हे केवळ दुर्गंधीचे पात्र आहे. यात केवळ मालिन्यच भरलेले आहे. केवळ मल, मूत्र निर्माण करणारा जणू हा कारखानाच आहे किंवा यंत्र आहे. अशा प्रकारे शरीराच्या अशुद्धीचे, मलीनतेचे ज्ञान झाल्याने मनुष्याला शरीराविषयी वैराग्य निर्माण होते. शरीराविषयी वैराग्य उत्पन्न झाल्याने त्याला वर्ण, आश्रम, अवस्था या संबंधीचा आपल्यात मोठेपणा, अभिमान येत नाही. याचसाठी शौच ठेवले जाते.

आजकाल प्रायः लोक म्हणतात की, जे शौचाचार पाळतात, ते तर दुसऱ्याचा अपमान करतात, दुसऱ्याविषयी घृणा करतात. त्यांचे असे म्हणणे अत्यंत चुकीचे आहे. कारण शौचाचे हे फल सांगितले गेले नाही की, आपण दुसऱ्यांचा तिरस्कार करावा, तर हे सांगितले गेले आहे की, यामुळे दुसऱ्याशी संसर्ग होणार नाही. "**परैरसंसर्गः**" तात्पर्य, प्रत्येक शरीराविषयी किळस निर्माण होईल की, हे सर्व पुतळे असेच अशुद्ध आहेत. जसे मातीच्या ढेकळाला कितीही पाण्याने धूत गेले, तर शेवटी ते सर्व विरून समाप्त होईल, परंतु त्यात माती शिवाय दुसरी चांगली वस्तू मिळणार नाही. त्याचप्रमाणे शरीर कितीही स्वच्छ ठेवत गेले, तरीही ते कधी शुद्ध होणार नाही. कारण त्याच्या मूळातच अशुद्धी आहे—

**स्थानाद् बीजादुपष्टम्भान्निःस्यन्दान्निधनादपि।**
**कायमाधेयशौचत्वात् पण्डिता ह्यशुचिं विदुः॥**
(योगदर्शन २।५ चे व्यासभाष्य)

"विद्वानलोक शरीराला स्थान (मातेच्या उदरात स्थित), बीज (माता-पित्याच्या रजोवीर्यापासून उत्पन्न), उपष्टम्भ (खाल्लेल्या-प्यालेल्या अन्नरसाने परिपुष्ट), निःस्यन्द (मल, मूत्र, लाळ, थुंकी, घाम इत्यादी स्रावाने युक्त), निधन (मरणधर्मा) आणि आधेय शौच (पाणी, माती इत्यादीनी धुण्यास योग्य) असल्यामुळे अपवित्र मानतात."

**आर्जवम्**—शरीराच्या ऐट-अक्कडचा त्याग करून उठणे-बसणे इत्यादी शारीरीक क्रिया साध्या सरळपणे करणे याचे नाव "आर्जव" आहे. अभिमान अधिक झाल्यानेच शरीरात मस्ती चढते. म्हणून कल्याण इच्छूक, साधकाने आपल्या ठिकाणी अभिमान ठेवू नये. निरभिमानिता राहिल्याने शरीरामध्ये आणि त्याच्या क्रिया चालणे, उठणे, बसणे, बोलणे, पाहणे इत्यादी सर्व क्रियांमध्ये स्वाभाविकच सरळता येते जे "आर्जव" आहे.

**ब्रह्मचर्यम्**—ह्या आठ क्रिया ब्रह्मचर्याला भंग करणाऱ्या आहेत. (१) पूर्वकृत स्त्रीसंग स्मरण (२) स्त्रीयांशी आसक्ती ठेवून गप्पा गोष्टी करणे (३) स्त्रीयांशी हास्य-विनोद करणे (४) स्त्रीयांकडे कामुक दृष्टीने पाहणे (५) स्त्रीयांशी एकांतात बोलणे (६) मनांत स्त्रीसंगाचा संकल्प करणे (७) स्त्रीसंगाचा पक्का विचार करणे (८) प्रत्यक्ष स्त्रीसंग करणे हे आठ प्रकारचे मैथुन विद्वानांनी सांगितले आहे.* यापैकी कोणतीही क्रिया कधी न होणे याचे नाव "**ब्रह्मचर्य**" आहे.

ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी या तिघांचा तर अजिबात वीर्यपात होता कामा नये. तसा संकल्पसुद्धा नसावा. गृहस्थीने केवळ संतानार्थ शास्त्रविधीप्रमाणे ऋतुकाळी स्त्रीसंग केल्यास तो गृहस्थाश्रमात राहूनही ब्रह्मचारीच मानला जातो. विधवांच्या बाबतही अशीच गोष्ट आहे की, जी स्त्री पती जीवित असतांना पातिव्रत्यधर्माचे पालन करीत राहते आणि त्याच्या मृत्यूनंतर ब्रह्मचर्य धर्माचे पालन करते,

* स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम्। सङ्कल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च॥ एतन्मैथुनमष्टाङ्गं प्रवदन्ति मनीषिणः। विपरीतं ब्रह्मचर्य-मनुष्ठेयं मुमुक्षुभिः॥

त्या विधवेची तीच गती होते जी आबाल ब्रह्मचाऱ्याची होते.

वास्तविक तर **"ब्रह्मचारिव्रते स्थितः"** (६।१४) ब्रह्मचाऱ्याच्या व्रतात स्थित राहणेच ब्रह्मचर्य आहे. परंतु यातही जर स्वप्नदोष झाला अथवा प्रमेहादी रोगाने ग्रस्त शारीरिक अवस्थेत वीर्यपात झाला, तर त्याला ब्रह्मचर्य भंग झाले असे मानले जात नाही. अंत:करणातील भाव बिघडल्याने जो वीर्यपात होतो तोच ब्रह्मचर्य भंग मानला जातो. कारण ब्रह्मचर्याचा भावाशी संबंध आहे. म्हणून ब्रह्मचर्य पालन करणाऱ्याने आपले भाव शुद्ध ठेवण्यासाठी आपले मन परस्त्री-कडे कधी जाऊ देऊ नये. सावध राहूनही कधी मन गेलेच तर अंत:करणात असा दृढ विचार करावा की, हे माझे काम नाही, मी असे काम करणारच नाही, कारण माझा ब्रह्मचर्य पालनाचा दृढ निश्चय आहे. मग मी असे काम कसे करू शकतो?

**अहिंसा**—सर्व प्रकारच्या हिंसेचा अभाव अहिंसा आहे. हिंसा स्वार्थ, क्रोध, लोभ आणि मोह (मूढता) यामुळे होत असते. ज्याप्रमाणे आपल्या स्वार्थासाठी कोणाच्या धनाचा अपहार केला, त्याचे नुकसान केले तर ही "स्वार्था" साठी केलेली हिंसा झाली. क्रोधात येऊन एखाद्याला शारीरिक थोडी इजा केली, घायाळ केले, अथवा ठार केले, तर ही "क्रोधा" मुळे झालेली हिंसा आहे. चामडे, मांस, यासाठी पशू हत्या केली किंवा धनासाठी एखाद्याला ठार केले, तर ही "लोभा" पायी झालेली हिंसा आहे. रस्त्यावर चालत असताना एखाद्या कुत्र्यास विनाकारण काठीने मारले, झाडाची फांदी तोडली, गवत उपटले, एखाद्याला ठोकर मारली, तर यात क्रोधही नाही, लोभही नाही किंवा स्वार्थही नाही—तर ही "मोहा" ने (मूढतेने) केलेली हिंसा आहे. अहिंसेत ह्या सर्व हिंसेचा अभाव आहे.*

**शारीरं तप उच्यते**—देवादिकांचे पूजन, शौच, आर्जव, ब्रह्मचर्य आणि अहिंसा—हे पाच प्रकारचे शारीरिक तप सांगितले गेले आहे. या शारीरिक तपात तीर्थ, व्रत, संयम, इत्यादीही घेतले पाहिजेत.

जेव्हा कष्ट होतात तेव्हा एक प्रकारची उष्णता, ताप निर्माण होतो, तेव्हा ते तप होते. परंतु उपर्युक्त शारीरिक तपात तर अशी गोष्ट नाही, तर मग हे तप कोणत्या प्रकारचे झाले? कष्ट सोसून जे तप केले जाते, ते वास्तविक श्रेष्ठ कोटीचे तप नाही. तपात कष्टाची मुख्यता ठेवणाऱ्यास भगवंतांनी **"आसुरनिश्चयान्"** (१७।६) आसुरनिश्चयी म्हटले आहे. तप तर तेच श्रेष्ठ आहे ज्यात उच्छृंखल वृत्तींना पायबंद घालून शास्त्र, कुलपरंपरा आणि लोकपरंपरा यांच्या मर्यादेनुसार संयमपूर्वक वर्तन करणे असते. त्याचप्रमाणे साधन करताना स्वाभाविकपणे देश, काळ, परिस्थिती, घटना आपल्या प्रतिकूल आल्या तरी साधन सिद्धीसाठी प्रसन्नतापूर्वक सहन करणे हेसुद्धा तपच आहे. या तपात शरीर, इंद्रिय, मन, इत्यादींचा संयम होतो.

अष्टांगयोगात ज्या ठिकाणी यम-नियमादी आठ अंगाचे वर्णन केले गेले आहे† तेथे "यमा" ला सर्वात प्रथम सांगितले आहे. जरी "यम" पाचच आहेत. **"अहिंसा-सत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः"** (योगदर्शन २।३०) आणि पाचच नियम आहेत. **"शौचसन्तोषतपः स्वाध्यायेश्वर-प्रणिधानानि नियमाः"** (योगदर्शन २।३२) तरीपण या दोन्हीपैकी नियमापेक्षा यमाचे अधिक महत्त्व आहे कारण "नियमा" मध्ये व्रतांचे पालन करावे लागते आणि "यमा" मध्ये इंद्रिय, मन इत्यादींचा संयम करावा लागतो.‡

लोकांच्या दृष्टीने ही गोष्ट असू शकते की, शरीराला कष्ट देणे तप आहे आणि आरामात राहून संयम करणे, त्याग करणे तप नाही, परंतु वास्तविक पाहिले तर संपूर्ण सांसारिक विषयांमध्ये अनासक्त होऊन जो संयम, त्याग केला जातो, तो तपापेक्षा कमी नाही, उलट पारमार्थिक मार्गात त्याचाच दर्जा उच्च आहे. कारण त्यागाने परमात्म्याची प्राप्ती होते— **"त्यागाच्छान्तिरनन्तरम्"** (१२।१२) केवळ बाह्य तपाने परमात्म्याची प्राप्ती सांगितली गेली नाही, परंतु अंत:करणाच्या शुद्धीला कारण असल्यामुळे ते तप परमात्मप्राप्तीत सहायक होऊ शकते. म्हणून साधकाने मुख्यत: यमाचे सेवन करून वेळो-वेळी नियमांचेही पालन करीत राहिले पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—शारीरिक तपात त्याग मुख्य आहे. जसे पूजन करण्यात आपल्या श्रेष्ठतेच्या भावाचा त्याग आहे, शुद्धी ठेवण्यात आळस-प्रमाद यांया त्याग आहे, सरळता सांभाळण्यात अभिमानाचा त्याग आहे, ब्रह्मचर्यात विषयसुखाचा त्याग आहे, अहिंसेत आपल्या सुखाच्या भावाचा त्याग आहे. अशाप्रकारे त्याग केल्याने शारीरिक तप होते.

---

* येथे "अहिंसा" शारीरिक तपाच्या अंतर्गत आलेली आहे, म्हणून येथे शरीरसंबंधीच अहिंसा घेतली जाईल, मन वाणीची अहिंसा घेतली जाणार नाही.

† यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावङ्गानि। (पातञ्जलयोगदर्शन २।२९)

‡ हिरण्यकशिपु, हिरण्याक्ष, रावण इत्यादी राक्षसांतही "नियम" तर दिसून येतात पण "यम" दिसून येत नाहीत.

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते॥ १५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **प्रियहितम्** | = प्रिय तसेच हितकारक | | इत्यादीही) |
| **अनुद्वेगकरम्** | = कोणालाही उद्विग्न न करणारे, | **वाक्यम्** | = भाषण आहे, (ते) | **वाङ्मयम्** | = वाणीसंबंधी |
| | | **च** | = तसेच | **तपः** | = तप |
| **सत्यम्** | = सत्य | **स्वाध्यायाभ्य-** | = स्वाध्याय आणि | **उच्यते** | = म्हटले जाते. |
| **च** | = आणि | **सनम्, एव** | अभ्यासही (नामजप | | |

*व्याख्या*— **अनुद्वेगकरं वाक्यम्**—जे वाक्य आत्ता किंवा पुढे कधीच कोणातही उद्वेग, विक्षेप, चलबिचल उत्पन्न करणारे नसते, ते वाक्य ''अनुद्वेगकर'' म्हटले जाते.

**सत्यं प्रियहितं च यत्**—जसे वाचले, ऐकले, पाहिले आणि निश्चय केलेले असेल ते जसेच्या तसेच आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून दुसऱ्यांना समजावण्यासाठी सांगितले जाते ते ''सत्य'' आहे.*

जे वाक्य क्रूरता, रूक्षता, तीक्ष्णता, निंदायुक्त, चुगली व्यंगयुक्त आणि अपमानकारक शब्दांनी रहित व प्रेमयुक्त, गोड, सरळ, आणि शांत वचनांनी बोलले जाते, ते वाक्य ''प्रिय'' म्हटले जाते.†

जे हिंसा, दंश, द्वेष, वैर इत्यादींनी सर्वथारहित असते आणि प्रेम, दया, क्षमा, उदारता, मङ्गल इत्यादींने भरलेले असते तसेच जे वर्तमानात आणि भविष्यातही आपले आणि दुसऱ्या कोणाचेही अनिष्ट करणारे नसते, ते वाक्य ''हित'' (हितकर) म्हटले जाते.

**स्वाध्यायाभ्यसनं चैव**—पारमार्थिक उन्नतीत सहायक असलेल्या गीता, रामायण, भागवत इत्यादी ग्रंथांना स्वतः वाचणे आणि दुसऱ्यांना शिकविणे, भगवान् आणि भक्तांचे चरित्र वाचणे इत्यादी ''**स्वाध्याय**'' आहे.

गीता इत्यादी पारमार्थिक ग्रंथाची पुन्हा पुन्हा आवृत्ती करणे, त्यांना कण्ठस्थ करणे, भगवन्नामाचा जप करणे, भगवंताची वारंवार स्तुती-प्रार्थना करणे इत्यादी ''**अभ्यसन**'' आहे.

**च एव**—या दोन अव्यय पदांनी वाणीसंबंधी तपाच्या इतर गोष्टीही घ्याव्यात. जसे निंदा न करणे, परदोष कथन न करणे, वृथा भाषण न करणे अर्थात् ज्यापासून आपले तसेच दुसऱ्यांचे कोणतेही लौकिक अथवा पारमार्थिक हित सिद्ध होत नाही—असे वचन न बोलणे, पारमार्थिक साधनेत बाधा करणारे तसेच शृंगार-रस काव्य, नाटक, उपन्यास इत्यादी न वाचणे अर्थात् ज्यापासून काम, क्रोध, लोभ इत्यादी विकारांना साहाय्यता मिळेल—अशी पुस्तके न वाचणे इत्यादी-इत्यादी.

**वाङ्मयं तप उच्यते**—उपर्युक्त सर्व लक्षणे ज्यात असतात, ते वाणीने होणारे तप म्हटले जाते.

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते॥ १६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मनः प्रसादः** | = मनाची प्रसन्नता, | **भावसंशुद्धिः** | = भावांची चांगल्या प्रकारे शुद्धी | **मानसम्** | = मनसंबंधी (मानसिक) |
| **सौम्यत्वम्** | = सौम्यभाव, | | | | |
| **मौनम्** | = मननशीलता, | **इति** | = याप्रमाणे | **तपः** | = तप |
| **आत्मविनिग्रहः** | = मनाचानिग्रह (आणि) | **एतत्** | = हे | **उच्यते** | = म्हटले जाते. |

*व्याख्या*— **मनःप्रसादः**—मनाच्या प्रसन्नतेला ''मनः प्रसाद'' म्हणतात. वस्तू, व्यक्ती, देश, काळ, परिस्थिती, घटना इत्यादींच्या संयोगाने उत्पन्न होणारी प्रसन्नता स्थायीरूपाने नेहमीसाठी राहू शकत नाही, कारण ज्याची उत्पत्ती होते, ती वस्तू स्थायी राहणारी नसते. परंतु दुर्गुण-दुराचाराशी संबंध-विच्छेद झाल्यावर जी स्थायी आणि स्वाभाविक-प्रसन्नता

* सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम्। प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः॥ (मनुस्मृति ४।१३८)
मनुष्याने सत्य व प्रिय बोलले पाहिजे. त्यात सत्य तर असावेच परंतु अप्रिय नसावे आणि प्रिय असावे परंतु असत्य नसावे. हाच सनातन धर्म आहे.

† प्रियवाक्यप्रदानेन सर्वे तुष्यन्ति जन्तवः। तस्मात्तदेव वक्तव्यं वचने का दरिद्रता॥
प्रिय वाक्य बोलण्याने मनुष्य, पशु-पक्षी, इत्यादी संपूर्ण प्राणी प्रसन्न होतात, म्हणून मनुष्याने प्रिय वाक्यच बोलले पाहिजे. बोलण्यात दरिद्रता-कंजूषी का करायची?

प्रगट होते ती कायम राहते आणि तीच प्रसन्नता मन, बुद्धी इत्यादीत येते, ज्यामुळे मन कधी अशांत होतच नाही अर्थात् मन सदैव प्रसन्न राहते.

मनात अशांती व चलबिचल केव्हा होते ? जेव्हा मनुष्य धन-संपत्ती, स्त्री-पुत्र इत्यादी नाशवान् वस्तूंचा आश्रय घेतो. ज्याचा आश्रय त्याने घेतला आहे त्या सर्व वस्तू येणाऱ्या-जाणाऱ्या आहेत, स्थायी राहणाऱ्या नाहीत. म्हणून त्यांच्या संयोग-वियोगाने त्याच्या मनात चलबिचल इत्यादी होत असते. जर साधकाने न राहणाऱ्या वस्तूंचा आश्रय सोडून नित्य-निरंतर राहणाऱ्या प्रभूचा आश्रय घेतला, तर मग पदार्थ, व्यक्ती इत्यादींच्या संयोग-वियोगाने त्याच्या मनात कधी अशांती, चलबिचल होणार नाही.

## मनाची प्रसन्नता प्राप्त करण्याचे उपाय

(१) सांसारिक वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, देश, काळ, घटना, इत्यादीविषयी मनात राग आणि द्वेष उत्पन्न होऊ देऊ नये.

(२) आपला स्वार्थ आणि अभिमान यासाठी कोणाशी पक्षपात करू नये.

(३) मनाला सदा दया, क्षमा, उदारता इत्यादी भावांनी परिपूर्ण ठेवणे.

(४) मनात प्राणीमात्राच्या हिताचा भाव असावा.

(५) **हितपरिमितभोजी नित्यमेकान्तसेवी**
**सकृदुचितहितोक्तिः स्वल्पनिद्राविहारः।**
**अनुनियमनशीलो यो भजत्युक्तकाले**
**स लभत इव शीघ्रं साधुचित्तप्रसादम्॥**
(सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह ३७२)

''जो शरीरासाठी हितकारक व नियमित भोजन करणारा आहे, सदा एकांतात राहण्याच्या स्वभावाचा आहे, कोणी विचारल्यास हिताची गोष्ट सांगतो अर्थात् मितभाषी आहे, झोपणे व फिरणे फार कमी प्रमाणात करतो. अशा प्रकारे ज्याचे खाणे-पिणे, विहार इत्यादी शास्त्रमयादेनुसार आहे, तो साधक फारच लवकर चित्ताच्या प्रसन्नतेला प्राप्त होतो.''—या उपायांनी मन सदा प्रसन्न राहते.

**सौम्यत्वम्**—हिंसा, क्रूरता, कुटिलता, असहिष्णुता, द्वेष इत्यादी भाव अंतःकरणात न राहिल्यास आणि भगवंताचे गुण, प्रभाव, दयाळुता सर्वव्यापकता इत्यादीवर अटळ विश्वास राहिल्यास साधकाच्या मनात स्वाभाविकच ''सौम्य भाव'' राहतो. मग त्याला कोणी वाकडे बोलले, त्याचा तिरस्कार केला, त्याच्यावर दोषारोपण केले, त्याच्याशी द्वेष-वैर ठेवले अथवा त्याचे धन, मान, महिमा इत्यादीची हानी झाली तरीही त्याच्या सौम्य भावात काहीही फरक पडत नाही.

**मौनम्**—अनुकूलता-प्रतिकूलता, संयोग-वियोग, राग-द्वेष, सुख-दुःख इत्यादी द्वन्द्वामुळे मनात चल-बिचल न होणे हेच वास्तविक ''मौन'' आहे.*

शास्त्रे, पुराणे आणि संत महापुरुष यांच्या वचनाचे आणि त्यांच्या गहन भावांचे मनन करीत रहावे, गीता, रामायण, भागवत इत्यादी भगवत्संबंधी ग्रंथात वर्णिलेले भगवंताचे गुण, चरित्र यांचे सदा मनन होत रहावे, सांसारिक प्राणी कशा प्रकारे सुखी होऊ शकतील? सर्वांचे कल्याण कोणत्या उपायांनी होऊ शकेल? कोण-कोणत्या सरळ युक्तींनी होऊ शकते ? त्या त्या उपायांचे, युक्तींचे मनात नेहमी मनन होत रहावे—हे सर्व ''मौन'' शब्दांतर्गत येऊ शकतात.

**आत्मविनिग्रहः**—मन पूर्ण एकाग्र व्हावे आणि तैल-धारवत् एकच चिंतन करीत रहावे, यालाही मनाचा निग्रह म्हणतात. परंतु मनाचा वास्तविक निग्रह हा आहे की, मन साधकाच्या वशमध्ये असावे अर्थात् मनाला जेथून हटवू इच्छिल तेथून ते हटले जावे आणि जेथे जितका वेळ लावू इच्छिल तेथे तितका वेळ लागून रहावे. तात्पर्य, साधकाने मनाच्या वश होऊन काम करू नये, तर मनाला वश करून काम करीत रहावे. अशा प्रकारे मनाचे वशीभूत होणे हाच वास्तविक ''आत्मनिग्रह'' आहे.

**भावसंशुद्धिः**—ज्या भावात आपला स्वार्थ आणि अभिमान ह्याचा त्याग असेल आणि दुसऱ्यांची हितकारिता असेल, त्याला ''भावसंशुद्धि'' अर्थात् भावाची महान् पवित्रता म्हणतात.

ज्यांच्या अंतःकरणात एका भगवंताचाच आश्रय असेल, भरवसा असेल, एका भगवंताचेच चिंतन असेल आणि एका भगवंताकडेच जाण्याचा निश्चय असेल, त्याच्या अंतःकरणातील भाव फार लवकर शुद्ध होतात. मग त्याच्या अंतःकरणात

* येथे ''मौनम्'' पद वाणीच्या मौना (चुप राहणे) चे वाचक नाही. जर हे वाणीच्या मौनाचे वाचक असते तर याला वाणीसंबंधी तपात दिले गेले असते. परंतु येथे ''मौन'' शब्द मानसिक तपाच्या अंतर्गत आला आहे.

गीतेत प्रायः असे दिसून येते की, जेथे अर्जुनाचा क्रियापरक प्रश्न असतो, तेथे भगवान् भावपरक उत्तर देतात. जसे दुसऱ्या अध्यायाच्या चौपन्नाव्या श्लोकात अर्जुनाने विचारले की, ''स्थितधीः किं प्रभाषेत'' स्थितप्रज्ञ पुरुष कसा बोलतो? तर भगवंतांनी उत्तर दिले ''दुःखेष्वनुद्विग्नमनाः ....... स्थितधीर्मुनिरुच्यते''. अर्थात् अनुकूलता प्रतिकूलता याविषयी त्याच्या मनात हर्ष-शोक होत नाहीत, तो स्थितप्रज्ञ ''मुनी'' (मौनी) आहे. तात्पर्य, भगवान् क्रियेपेक्षा भावाला श्रेष्ठ मानतात. म्हणून भगवंतांनी येथेही ''मौना'' ला मानसिक तपात घेतले आहे.

उत्पत्ती विनाशशील सांसारिक वस्तूचा आश्रय राहत नाही, कारण संसाराचा आश्रय ठेवल्यानेच भाव अशुद्ध होतात.

**इत्येतत्तपो मानसमुच्यते**—अशा प्रकारे ज्या तपात मनाची मुख्यता असते ते मानस (मनसंबंधी) तप म्हटले जाते.

**परिशिष्ट भाव**—प्रतिकूल परिस्थितीतही प्रसन्न रहावे. आपल्यावर परिस्थितीचा परिणाम होऊ देऊ नये. दुसऱ्याकडून प्रतिकूल गोष्ट ऐकली तरीही शांत राहणे. मनाच्या स्वतंत्रतेचा त्याग करून मनन करावे, कारण मनाला स्वतंत्र सोडल्यास सुखभोग होतो, मननशीलता येत नाही. मनाच्या मूढ, क्षिप्त आणि विक्षिप्त वृत्तींचा त्याग करावा. आपल्या मनात कोणाच्या अहिताचा भाव असू नये. हे सर्व मनसंबंधी तप आहे.

***संबंध**—आता भगवान् पुढील तीन श्लोकांत क्रमाने सात्त्विक, राजस आणि तामस तपाचे वर्णन करतात.*

## श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः।
## अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते॥ १७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परया** | = परम | **नरैः** | = मनुष्यांद्वारा (जे) | **तप्तम्** | = केले जाते, |
| **श्रद्धया** | = श्रद्धेने | **त्रिविधम्** | = तीन प्रकारचे (शरीर, वाणी आणि मन याचे) | **तत्** | = त्याला |
| **युक्तैः** | = युक्त | | | **सात्त्विकम्** | = सात्त्विक |
| **अफलाकाङ्क्षिभिः** | = फलेच्छारहित | **तपः** | = तप | **परिचक्षते** | = म्हणतात. |

***व्याख्या***— **श्रद्धया परया तप्तम्**—शरीर, वाणी व मन याद्वारा जे तप केले जाते, ते तपच माणसाचे सर्वश्रेष्ठ कर्तव्य आहे आणि हाच मानवजीवनाच्या उद्देशपूर्तीचा अचूक उपाय आहे.* हा उपाय संगोपांग चांगल्या रीतीने केल्यास मनुष्याला काहीच करणे शिल्लक राहत नाही. अर्थात् जे वास्तविक तत्त्व आहे, त्यात आपोआप स्थिती होते— अशा अटल विश्वासपूर्वक श्रेष्ठ श्रद्धेने मोठमोठया विघ्नांची आणि बाधांची काहीही परवा न करता उत्साह व आदरपूर्वक तपाचरण करणे हेच परम श्रद्धायुक्त माणसाद्वारा ते तप करणे आहे.

**अफलाकाङ्क्षिभिः युक्तैः नरैः**—येथे या दोन विशेषणासह "नरैः" पद देण्याचे तात्पर्य, आंशिक सद्गुण-सदाचार तर प्राणीमात्रात राहतच असतात, परंतु मनुष्याची विशेषता ही आहे की, तो सद्गुण-सदाचारांना सांगोपांग आणि विशेषतेने आपल्यात बाणवू शकतो आणि दुर्गुण-दुराचार, कामना, मूढता इत्यादी दोषांना संपूर्णपणे मिटवू शकतो. निष्कामभाव मनुष्यातच होऊ शकतो.

सात्त्विक तपात तर "नर" शब्द दिला आहे, परंतु राजस, तामस तपात मनुष्य वाचक शब्द दिलाच नाही. तात्पर्य आपल्या कल्याणार्थ अमूल्य मनुष्यशरीर मिळूनही जे कामना, दंभ, मूढता, इत्यादी दोषांच्या आहारी गेलेले आहेत ते मनुष्य म्हणविण्यास लायकच नाहीत.

फलेच्छा न ठेवता निष्कामभावाने तपोनुष्ठान करणाऱ्या माणसासाठी येथे उपर्युक्त पदे आलेली आहेत.

**तपस्तत्त्रिविधम्**—येथे केवळ सात्त्विक तपात "त्रिविध" पद दिले आहे आणि राजस, तामस तपामध्ये "त्रिविध" पद न देता "**यत्-तत्**" पद देऊनच काम भागविले आहे. याचा आशय असा आहे की; शारीरिक, वाचिक आणि मानसिक तिन्ही तप केवळ सात्त्विकातच सांगोपांग येऊ शकतात, राजस तसेच तामस यात आंशिकरूपानेच येऊ शकतात. यातही राजसात काही अधिक लक्षणे येतील कारण राजस माणसाचे लक्ष शास्त्रविधीकडे असते. परंतु तामसात त्या तपाची फारच कमी लक्षणे येतील, कारण तामस मनुष्यात मूढता, दुसऱ्यांना दुःख देणे इत्यादी दोष असतात.

दुसरी गोष्ट तेराव्या अध्यायात, सातव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत ज्या ज्ञानाच्या वीस साधनांचे वर्णन आलेले आहे, त्यातही शारीरिक तपाची तीन लक्षणे—शौच, आर्जव आणि अहिंसा तसेच मानसिक तपाची दोन लक्षणे—मौन आणि आत्मविनिग्रह आलेली आहेत. त्याचप्रमाणे सोळाव्या अध्यायात पहिल्यापासून तीसऱ्या श्लोकापर्यंत ज्या दैवी-संपत्तीची सव्वीस लक्षणे सांगितली गेली आहेत, त्यातही शारीरिक तपाची तीन लक्षणे—शौच, अहिंसा आणि आर्जव तसेच वाचिक तपाची दोन लक्षणे—सत्य आणि स्वाध्याय आलेली आहेत. म्हणून ज्ञानाच्या ज्या साधनांनी तत्त्वबोध होईल तसेच दैवी-संपत्तीच्या ज्या गुणांनी मुक्ती होईल, ती लक्षणे अथवा गुण राजस, तामस होऊ शकत नाहीत. म्हणून राजस आणि तामस तपात शारीरिक, वाचिक आणि मानसिक—या तिन्ही प्रकारचे तप सांगोपांग घेतले जाऊ

* शरीर, वाणी आणि मनाचे तप, जेव्हा नाशवान् वस्तूंच्या संबंध-विच्छेदाचा उद्देश असतो, तेव्हाच सांगोपांग रूपाने संपन्न होते.

शकत नाही. तेथे तर "**यत्-तत्**" पदांनी आंशिकरूपाने जितके येईल तितकेच घेतले जाऊ शकेल.

तीसरी गोष्ट भगवद्गीतेचे साद्यन्त अध्ययन केल्यावर असा निष्कर्ष निघतो की, हिचा उद्देश केवळ जीवाचे कल्याण करणे हाच आहे. कारण अर्जुनाचा जो प्रश्न आहे तो निश्चित श्रेयाचा (कल्याणाचा) आहे. (२।७, ३।२, ५।१) भगवंतांनीही उत्तरात जितकी साधने सांगितली आहेत ती "सर्व जीवांचे निश्चित कल्याण व्हावे" या उद्देशानेच सांगितली आहेत. म्हणून गीतेत जेथे कोठे सात्त्विक, राजस व तामस असे प्रकार सांगितले गेले आहेत, तेथे जो सात्त्विक विभाग आहे तो ग्राह्य आहे, कारण तो मुक्ती देणारा आहे "**दैवी सम्पद्विमोक्षाय**" आणि जो राजस व तामस विभाग आहे तो त्याज्य आहे. कारण तो विभाग बंधनकारक आहे—"**निबन्धायासुरी मता**" ह्याच आशयाने भगवान् येथे सात्त्विक तपात शारीरिक, वाचिक, मानसिक या तीन तपांचा निर्देश करण्यासाठी "**त्रिविधम्**" पद देतात.

**सात्त्विकं परिचक्षते**—परम श्रद्धेने युक्त फलेच्छारहित माणसाकडून केले जाणारे तप सात्त्विक म्हटले जाते.

# सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत्।
# क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्॥ १८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **दम्भेन, एव** | = दाखविण्याच्या भावानेही | **चलम्** | = अनिश्चित (आणि) |
| **तपः** | = तप | | | **अध्रुवम्** | = नाशवान् फल देणारे (तप) |
| **सत्कारमान-पूजार्थम्** | = सत्कार, मान आणि पूज्यता यासाठी | **क्रियते** | = केले जाते, | | |
| | | **तत्** | = ते | **राजसम्** | = राजस |
| **च** | = तसेच | **इह** | = या लोकात | **प्रोक्तम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— **सत्कारमानपूजार्थं तपः क्रियते**—राजस माणसे सत्कार, मान, पूज्यता यासाठीच तप करीत असतात. जसे—आम्ही जाऊ तेथे लोक आम्हाला तपस्वी समजून सामोरे येतील, गावभर मिरवतील. जागजागी लोक आम्हाला उत्थापन देतील, आम्हाला बसण्यासाठी आसन देतील, आमच्या नावाचा जयघोष करतील, आमच्याशी गोड बोलतील, अभिनंदन पत्र देतील इत्यादी बाह्य क्रियांनी आमचा "**सत्कार**" करतील. आम्हाला लोक मनातून श्रेष्ठ समजतील की, हे फार सयंमी, सत्यवादी, अहिंसक सज्जन आहेत. ते सामान्य माणसांपेक्षा आमच्यात विशेष भाव ठेवतील इत्यादी. हृदयातील भावांनी लोक आमचा "**मान**" करतील. जिवंतपणीच लोक आमचे पाय धुतील, मस्तकावर फुले वाहतील, माळा घालतील, आरती करतील, आम्हाला नमस्कार करतील, आमचे चरण रज मस्तकावर धारण करतील आणि मृत्यूनंतर आमची मोठी अन्त्य यात्रा काढतील, स्मारक बांधतील, त्यावर लोक श्रद्धाभक्तीने फुले पाने, चंदन, वस्त्र, पाणी इत्यादी अर्पण करतील, स्मारकाची परिक्रमा करतील अशा क्रियेने आमची "**पूजा**" करतील.

**दम्भेन चैव यत्**—अंत:करणातून तपावर श्रद्धा व भाव नसूनही बाहेरुन केवळ लोकांना दाखविण्यासाठी आसन लावून बसणे, माळ जपणे, देवतेचे पूजन करणे, सरळपणाने वागणे, हिंसा न करणे इत्यादी.

**तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्**—राजस फलाचे तप चल व अध्रुव म्हटले गेले आहे. तात्पर्य जे तप सत्कार, मान, पूज्यतेसाठी केले जाते, त्या राजस तपाचे फल येथे "चल" अर्थात् नाशवान् म्हटले गेले आहे आणि जे तप केवळ दिखाऊपणासाठी केले जाते, त्याचे फल येथे "अध्रुव" अर्थात् अनिश्चित (फल मिळो अथवा न मिळो, दंभ सिद्ध होवो अथवा न होवो) म्हटले गेले आहे.

**इह प्रोक्तम्**—पदांचे तात्पर्य, या राजस तपाचे इष्ट फल प्राय: येथेच मिळणारे असते. कारण सात्त्विक पुरुषांचा ऊर्ध्वलोक, तामस मनुष्यांचा अधोलोक आणि राजस माणसांचा मध्यलोक आहे. (१४।१८) म्हणून राजस तपाचे फल स्वर्ग किंवा नरक न होता येथेच प्रसिद्धी प्रशंसा होऊन नष्ट होऊन जाईल.

राजस माणसाकडून शारीरिक, वाचिक आणि मानसिक तप होऊ शकते काय? फलेच्छा असल्याने तो देवता इत्यादिकांचे पूजन करू शकतो. त्याच्यात काही साधेपणा, सरळपणाही असू शकतो. ब्रह्मचर्य राहणे कठीण आहे. अहिंसा-ही कठीण आहे. पुस्तके इत्यादी वाचू शकतो. त्याचे मन सदा प्रसन्न राहू शकत नाही आणि सौम्य भावही सदा राहू शकत नाही. कामनेमुळे त्याच्या मनात संकल्प-विकल्प होत राहतील. तो केवळ सत्कार, मान, पूज्यतेसाठी आणि दंभासाठीच तप करत असतो, तर मग त्याच्या भावांची संशुद्धी कशी होईल अर्थात् त्याचे भाव कसे शुद्ध होतील? म्हणून राजस मनुष्य तीन प्रकारचे तप सांगोपांग करू शकत नाही.

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्॥ १९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **पीडया** | = कष्ट देऊन | **क्रियते** | = केले जाते, |
| **तपः** | = तप | **वा** | = अथवा | **तत्** | = ते (तप) |
| **मूढग्राहेण** | = मूढतापूर्वक हट्टाने | **परस्य** | = दुसऱ्यांना. | **तामसम्** | = तामस |
| **आत्मनः** | = स्वतःला | **उत्सादनार्थम्** | = कष्ट देण्यासाठी | **उदाहृतम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— **मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः**— तामस तपात मूढतापूर्वक आग्रह असल्याने आपल्या स्वतःला कष्ट देऊन तप केले जाते. तामस माणसात मूढतेचे प्राधान्य असते. म्हणून ज्यात शरीराला, मनाला कष्ट होतील, त्यालाच ते तप मानतात.

**परस्योत्सादनार्थं वा**—अथवा ते दुसऱ्याला दुःख देण्यासाठी तप करतात. त्यांचा असा भाव राहतो की, शक्ती प्राप्त करण्यासाठी तप (संयम इत्यादी) करण्यात मला कष्ट कितीही झाले तरी चालतील, पण दुसऱ्यांना नष्ट भ्रष्ट तर करायचेच! तामस माणूस दुसऱ्यांना दुःख देण्यासाठी त्या तीन (कायिक, वाचिक आणि मानसिक) तपांच्या आंशिक भागाव्यतिरिक्त मनमानेल तसे उपवास करणे, शीतोष्ण सहन करणे इत्यादी तपही करू शकतो.

**तत्तामसमुदाहृतम्**—तामस माणसाचा उद्देशच दुसऱ्यांना कष्ट देणे, त्यांचे अनिष्ट करणे हाच राहतो. म्हणून अशा उद्देशाने केले गेलेले तप तामस म्हटले जाते.

[सात्त्विक मनुष्य फलेच्छारहित परम श्रद्धेने तप करतो, म्हणून वास्तविक तोच मनुष्य म्हणविण्यास लायक आहे. राजस मनुष्य सत्कार, मान, पूज्यता तसेच दंभासाठी तप करतो, म्हणून तो मनुष्य म्हणविण्यास लायक नाही. कारण सत्कार, मान इत्यादी तर पशू पक्ष्यांनाही प्रिय लागतात आणि ते बिचारे दंभही करीत नाहीत. तामस मनुष्य तर पशूपेक्षाही निकृष्ट आहे. कारण पशु-पक्षी स्वतःवर दुःख ओढवून घेऊन दुसऱ्यांना दुःख देत नाहीत, परंतु हा तामस मनुष्य तर स्वतः दुःख भोगून दुसऱ्यांनाही दुःखी करतो.]

**परिशिष्ट भाव—'मूढग्राहेण'** यात तर शुद्ध तमोगुण आहे, परंतु **'परस्योत्सादनार्थम्'**, यात रजोगुण मिसळलेला आहे. मूढता तमोगुण आहे आणि स्वार्थभाव, क्रोध इत्यादी राजस आहेत. क्रोध रजोगुणाने उत्पन्न होऊन तामेगुणात जातो—**'क्रोधाद्भवति सम्मोहः'** (गीता २। ६३).

***संबंध***—*आता भगवान् पुढील तीन श्लोकांत क्रमाने सात्त्विक, राजस आणि तामस दानाची लक्षणे सांगतात.*

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम्॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दातव्यम्** | = दान देणे कर्तव्य आहे— | **च** | = तसेच | | भावाने |
| **इति** | = अशा भावनेने | **काले** | = काळ | **दीयते** | = दिले जाते, |
| **यत्** | = जे | **च** | = (आणि) | **तत्** | = ते |
| **दानम्** | = दान | **पात्रे** | = पात्र प्राप्त झाल्यावर | **दानम्** | = दान |
| **देशे** | = देश | **अनुपकारिणे** | = अनुपकाऱ्याला अर्थात् निष्काम- | **सात्त्विकम्** | = सात्त्विक |
| | | | | **स्मृतम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— या श्लोकात दानाचे दोन विभाग आहेत—

(१) **"दातव्यमिति यद्दानं दीयते अनुपकारिणे"** आणि (२) **"देशे काले च पात्रे च"**

**दातव्यमिति......देशे काले च पात्रे च**—केवळ देणे हेच माझे कर्तव्य आहे. कारण मी वस्तूंचा स्वीकार केला आहे अर्थात् त्यांना आपले मानले आहे. ज्याने वस्तूंचा स्वीकार केला आहे, त्याच्यावरच देण्याची जवाबदारी येते. म्हणून देणे हेच माझे कर्तव्य आहे. या भावनेने दान केले पाहिजे. त्याचे येथे कोणते फल मिळेल आणि परलोकात कोणते फल मिळेल—हा भाव मुळीच असता कामा नये. "दातव्य" चे तात्पर्यच त्यागात आहे.

आता कोणाला द्यावे? तर म्हणतात **"दीयतेऽनुपकारिणे"**

अर्थात् ज्याने कधी पूर्वी आपल्यावर उपकार केलाच नाही, आत्ताही उपकार करीत नाही आणि पुढे कधी आपल्यावर उपकार करेल याची शक्यताही नाही. अशा ''अनुपकाऱ्या''ला निष्कामभावनेने दिले पाहिजे. याचे तात्पर्य असे नाही की, ज्याने आपल्यावर उपकार केला आहे, त्याला देऊ नये, उलट ज्याने आपल्यावर उपकार केला आहे, त्याला देण्यात दान मानू नये. कारण केवळ देण्यानेच खऱ्या उपकाराची फेड होऊ शकत नाही. म्हणून ''उपकारी'' चीही अवश्य सेवा साहाय्यता केली पाहिजे, परंतु ती दानात जमा धरू नये. उपकाराची आशा ठेवून केलेले दान राजसी होते.

**''देशे काले च पात्रे च''***—या पदांचे दोन अर्थ होतात

(१) ज्या देशात जी वस्तू नाही आणि त्या वस्तूची आवश्यकता आहे, त्या देशात ती वस्तू देणे, ज्या काळात ज्या वस्तूची आवश्यकता आहे, त्या काळात ती वस्तू देणे, आणि ज्याच्याजवळ जी वस्तू नाही आणि त्याला त्याची आवश्यकता आहे, त्या अभावग्रस्ताला ती वस्तू देणे.

(२) गंगा, यमुना, गोदावरी इत्यादी नद्या आणि कुरुक्षेत्र, प्रयागराज, काशी इत्यादी पवित्र देश प्राप्त झाल्यावर दान देणे, अमावस्या पौर्णिमा, व्यतिपात, अक्षय तृतीया, संक्रात इत्यादी पवित्र काळ प्राप्त झाल्यावर दान देणे आणि वेदपाठी ब्राह्मण, सद्गुणी—सदाचारी भिक्षुक इत्यादी उत्तम पात्र प्राप्त झाल्यावर दान देणे.

**''देशे काले च पात्रे च''** पदांनी उपर्युक्त दोन्हीही अर्थ घेतले पाहिजेत.

**तद्दानं सात्त्विकं स्मृतम्**—अशा प्रकारे दिलेले दान सात्त्विक म्हटले जाते. तात्पर्य, संपूर्ण सृष्टीच्या जितक्या वस्तू आहेत, त्या सर्वांच्या आहेत आणि सर्वांसाठी आहेत, आपल्या व्यक्तिगत नाहीत. म्हणून अनुपकारी व्यक्तीलाही ज्या वस्तूची आवश्यकता आहे, ती वस्तू त्याचीच समजून त्याला दिली पाहिजे. ज्याच्या जवळ जी वस्तू पोहचेल, तिच्यावर त्याचाच हक्क आहे. कारण जर ती त्याची वस्तू नसती, तर दुसऱ्या व्यक्तीची इच्छा असूनही त्याला ती वस्तू देऊ शकणार नाही. म्हणून अगोदरपासूनच असे समजावे की, त्याचीच वस्तू त्याला द्यावयाची आहे, आपली वस्तू (आपली मानून) त्याला द्यावयाची नाही. तात्पर्य, जी वस्तू आपली नाही आणि आपल्याजवळ आहे अर्थात् तिला आपण आपली समजले आहे, त्या वस्तूला आपली न समजण्यासाठी त्याची समजून त्यालाच द्यावयाची आहे.

अशा प्रकारे जे दान दिले असता वस्तू, फल आणि क्रियेशी आपला संबंध-विच्छेद होतो, ते दान सात्त्विक म्हटले जाते.

**परिशिष्ट भाव**—हे सात्त्विक दान वास्तविक त्याग आहे. हे दान तसे नाही ज्याच्यासाठी म्हटले गेले आहे—'एक गुणे दान, सहस्रगुणे पुण्य'. कारण त्या दानाने (सहस्राशी) संबंध जडतो.† परंतु त्यागाने संबंध-विच्छेद होतो. दानाच्या मोबदल्यात काही प्राप्त करण्याची कामना केल्याने ते दान राजस होते—**'यत्तु प्रत्युपकारार्थं'** (गीता १७। २१). या राजस भावाचा निषेध करण्यासाठी येथे 'अनुपकारिणे' पद आले आहे.

गीतेत वर्णन केलेला सात्त्विक गुण त्यागाकडे जातो, म्हणून भगवंताने त्याला 'अनामय' म्हटले आहे (चोदाव्या अध्यायाचा सहावा श्लोक). सत्त्वगुण संबंध-विच्छेद (त्याग) करतो, रजोगुण संबंध जोडतो आणि तमोगुण 'मूढता' आणतो.

गीतेनुसार दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणे 'यज्ञ' आहे, नेहमी प्रसन्न राहणे 'तप' आहे आणि ज्याची वस्तू त्याला देणे 'दान' आहे. स्वार्थबुद्धिपूर्वक आपल्यासाठी यज्ञ-तप-ज्ञान करणे आसुरी अथवा राक्षसी स्वभाव आहे.

## यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः।
## दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम्॥ २१॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **वा** | = अथवा | **दीयते** | = दिले जाते, |
| **यत्** | = जे (दान) | **फलम्** | = फल-प्राप्तीचा | **तत्** | = ते |
| **परिक्लिष्टम्** | = क्लेशपूर्वक | | | **दानम्** | = दान |
| **च** | = आणि | **उद्दिश्य** | = उद्देश ठेवून | **राजसम्** | = राजस |
| **प्रत्युपकारार्थं** | = प्रत्युपकारासाठी | **पुनः** | = मग | **स्मृतम्** | = म्हटले जाते. |

* येथे देश, काल आणि पात्र तिन्हीत ''यस्यच भावेन भावलक्षणम्'' या सूत्राप्रमाणे सप्तमी केली गेली आहे.

† सुपात्रदानाच्च भवेद्धनाढ्यो धनप्रभावेण करोति पुण्यम्। पुण्यप्रभावात्सुरलोकवासी पुनर्धनाढ्यः पुनरेव भोगी॥
कुपात्रदानाच्च भवेद्दरिद्रो दारिद्रदोषेण करोति पापम्। पाप प्रभावान्नरकं प्रयाति पुनर्दरिद्रः पुनरेव पापी॥

*व्याख्या*— **यत्तु प्रत्युपकारार्थम्**—राजस दान प्रत्युपकारासाठी दिले जाते. जसे राजस पुरुष एखाद्या विशेष प्रसंगी दानाच्या वस्तूंना मोजून काढून घेतो आणि विचार करतो की, आपल्या नातेवाईकांचे जे कुलपुरोहित आहेत, त्यांना आपण दान देऊ म्हणजे आपले नातेवाईक आपल्या कुलपुरोहिताला दान करतील आणि अशा प्रकारे आपल्या कुलपुरोहिताजवळ पुष्कळ धन जमा होईल. अमुक ब्राह्मण चांगले आहेत आणि ते ज्योतिषही जाणतात. त्यांना आपण दान देऊ म्हणजे ते यात्रा, मुलामुलींची लग्ने, नवीन घर बांधणे, आड खोदणे, यासाठी मुहूर्त काढून देतील. जे आपले संबंधी आहेत अथवा आपले हित करणारे आहेत, त्यांना आपण साहाय्यतारूपाने पैसे देऊ त्यामुळे तेही कधी आपल्याला मदत करतील, आपले हित करतील. आपल्याला औषधी देणारे जे वैद्य आहेत त्यांना आपण दान देऊ म्हणजे ते खूश होऊन आपल्याला चांगली चांगली औषधी देतील, इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे प्रतिफलाची भावना ठेवून अर्थात् या लोकी संबंध जोडून जे दान केले जाते ते "प्रत्युपकारार्थ" म्हटले जाते.

**फलमुद्दिश्य वा पुनः**—फलाचा उद्देश ठेवून अर्थात् परलोकाशी संबंध जोडून जे दान केले जाते त्यातही राजस मनुष्य देश (गंगा, यमुना, कुरुक्षेत्र इत्यादी), काळ (अमावस्या, पौर्णिमा, ग्रहण इत्यादी) आणि पात्र (वेदपाठी ब्राह्मण इत्यादी) याला पाहतो तसेच शास्त्रीय विधि-विधानाला पाहतो. परंतु अशा प्रकारे विचारपूर्वक दान केल्यावरही फलाची कामना असल्याने ते दान राजस होते. आता त्यासाठी दुसऱ्या विधि-विधानाचे वर्णन करण्याची भगवंतांना आवश्यकता वाटली नाही. म्हणून राजस दानात "**देशे काले च पात्रे**" पदांचा प्रयोग केला गेला नाही.

येथे "**पुनः**" पद म्हणण्याचे तात्पर्य, ज्याच्याकडून पूर्वी आपल्यावर उपकार झाला आहे अथवा भविष्यात काहीना काही त्याच्याकडून मिळण्याची शक्यता आहे, त्याचा विचार राजस पुरुष अगोदर करतो, त्यानंतर मग दान देतो.

**दीयते च परिक्लिष्टम्**—राजस दान फार क्लेशपूर्वक दिले जाते. जसे—आता वेळ आलीच आहे म्हणून द्यावे लागत आहे. एवढ्या वस्तू दिल्या तर एवढ्या कमी होतील. एवढे धन दिले तर एवढे धन कमी होईल. ते प्रसंगी आम्हाला मदत करतात म्हणून त्यांना द्यावे लागत आहे. एवढ्यातच काम होईल तर बरे होईल. एवढ्याने काम भागले तर जास्त कशाला द्यावयाचे? जास्त दिले तर परत कोठून आणायचे? आणि जास्त दिले तर घेणाऱ्याचा स्वभाव बिघडेल. जास्त दिले तर आपला तोटा होईल, मग व्यवहार कसा चालेल? परंतु इतके तर द्यावेच लागत आहे इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे राजस माणूस दान तर थोडेच देतो पण फार घासाघीस करून देतो.

**तद्दानं राजसं स्मृतम्**—उपर्युक्त प्रकाराने दिले जाणारे दान राजस म्हटले गेले आहे.

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम्॥ २२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **अवज्ञातम्** | = अवज्ञापूर्वक | **दीयते** | = दिले जाते, |
| **दानम्** | = दान | **अदेशकाले** | = अयोग्य देश आणि काळात | **तत्** | = ते (दान) |
| **असत्कृतम्** | = सत्काराविना | | | **तामसम्** | = तामस |
| **च** | = तसेच | **अपात्रेभ्यः** | = कुपात्राला | **उदाहृतम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— **असत्कृतमवज्ञातम्**—तामस ज्ञान असत्कार आणि अवज्ञापूर्वक दिले जाते. जसे—तामस मनुष्याजवळ कधी दान घेण्यासाठी ब्राह्मण आला, तर तो त्याला तिरस्काराने म्हणेल. पंडीतजी आपण माझी आई शांत झाली तेव्हाही आला नाहीत, परंतु काय करावे आपण माझे कुलगुरू आहात म्हणून आपणाला द्यावेच लागते. इतक्यात घरचा दुसरा माणूस म्हणतो. तुम्ही कशाला या ब्राह्मणाच्या भानगडीत पडता? एखाद्या गरीबाला दान करा. ज्याला कोणी देत नाही त्याला द्या. वास्तविक तेच दान आहे. ब्राह्मणाला तर दुसरा कोणीही देईल परंतु बिचाऱ्या गरीबाला कोण देईल? पंडीतजी कशाचे आले, हा तर कुत्राच आला आहे, तुकडा टाकून द्या, नाही तर भुंकेल, इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे शास्त्रविधीचा आणि ब्राह्मणाचा तिरस्कार केल्यामुळे हे दान तामस म्हटले जाते.

**अदेशकाले यद्दानम्**—मूढतेमुळे तामस मनुष्याला आपल्याच मनाचे विचार पटतात. जसे दान करण्यासाठी देश काळाची काय जरूरी आहे? जेव्हा वाटेल तेव्हा केले.जर एखाद्या स्थळी व काळी दान केल्याने पुण्य होते तर ते पुण्य येथे दान केल्याने का होणार नाही? यासाठी अमुक पर्व येईल, अमुक समय येईल याची काय आवश्यकता आहे? आपली वस्तू खर्च करावयाची आहे. पाहिजे तेव्हा खर्च करू इत्यादी-इत्यादी. अशा प्रकारे तामस माणसे शास्त्रविधीचा अनादर,

तिरस्कार करून दान करतात. कारण त्यांच्या अंत:करणात शास्त्रविधीचे महत्त्व नसते, तर रुपयाचे महत्त्व असते.

**अपात्रेभ्यश्च दीयते**—तामस दान अपात्राला दिले जाते. तामस मनुष्य अनेक प्रकारचे तर्क वितर्क करून पात्राचा विचार करीत नाही. जसे-शास्त्रात देश, काळ आणि पात्र याविषयी पोकळ गोष्टी लिहिल्या आहेत. एखाद्याने येथे दान घेतले तर त्याचे पोट भरणार नाही काय? तृप्ती होणार नाही काय? जर पात्राला दिल्याने पुण्य होते तर यांना दिल्याने पुण्य होणार नाही काय? हे काय माणसं नाहीत? यांना दिल्याने पाप लागेल काय? आपला जीवननिर्वाह चालविण्यासाठी, आपला स्वार्थ सिद्ध करण्यासाठीच ब्राह्मणांनी शास्त्रात असे लिहून ठेवले आहे. इत्यादी.

**तत्तामसमुदाहृतम्**—उपर्युक्त प्रकाराने दिले जाणारे दान तामस म्हटले गेले आहे.

**शंका**—गीतेत तामस कर्माचे फल अधोगती सांगितले आहे. "**अधो गच्छन्ति तामसाः**" (१४।१८) आणि रामचरितमानसमध्ये म्हटले आहे की, कोणत्याही प्रकाराने केलेले दान कल्याण करते—"**जेन केन बिधि दीन्हे दान करइ कल्यान**" (मानस ७।१०३ ख). या दोहोत विरोध का येतो?

**समाधान**—तामस माणसे अधोगतीला जातात—हा नियम दानाच्या विषयात लागू होत नाही कारण धर्माचे चार चरण आहेत. "**सत्यं दया तपो दानमिति**" (श्रीमद्भा० १२।३।१८) या चार चरणांपैकी कलियुगात एकच चरण "दान" आहे. "**दानमेकं कलौ युगे**" (मनुस्मृति १।८६) म्हणून गोस्वामी महाराज यांनी म्हटले आहे.

**प्रगट चारि पद धर्म के कलि महुँ एक प्रधान।**
**जेन केन बिधि दीन्हें दान करइ कल्यान॥**
(मानस ७।१०३ ख)

असे म्हणण्याचे तात्पर्य, कोणत्याही प्रकाराने दान केले तरी त्यात पदार्थादिकाशी असलेल्या आत्मीयतेचा त्याग करावाच लागतो. या दृष्टीने तामस ज्ञानातही आंशिक त्याग असल्यामुळे दान देणारा अधोगतीला पात्र होऊ शकत नाही.

दुसरी गोष्ट, या कलियुगाच्या काळात मनुष्याचे अन्तः-करण फार मलिन होत आहे. म्हणून कलियुगात एक सवलत आहे की, कोणत्याही प्रकाराने केलेले दान कल्याण करते. यामुळे मनुष्याचा दान करण्याचा स्वभाव तर बनेलच, जो पुढे कधी कोण्या जन्मात कल्याणही करू शकतो परंतु दानाची क्रियाच जर बंद झाली तर मग देण्याचा स्वभाव बनण्याची संधीच प्राप्त होणार नाही. याच दृष्टीने एका संताने "**श्रद्धया देयमश्रद्धयादेयम्**" (तैत्तिरीय० १।११) या श्रुतीची व्याख्या करताना म्हटले होते की, यात पहिल्या पदाचा अर्थ तर हा आहे की, श्रद्धेने दिले पाहिजे, परंतु दुसऱ्या पदाचा अर्थ "**अश्रद्धया अदेयम्**" (अश्रद्धेने देऊ नये) असा न घेता "**अश्रद्धया देयम्**" (श्रद्धानसली तरीही दिले पाहिजे) असा घेतला पाहिजे.

## दानासंबंधी विशेष गोष्ट

अन्न, पाणी, वस्त्र आणि औषध—या चारींच्या दानात पात्र कुपात्र इत्यादींचा विशेष विचार करता कामा नये. यात केवळ दुसऱ्याच्या आवश्यकतेकडेच पहावे. यातही देश, काळ आणि पात्र प्राप्त झाले तर फारच उत्तम, परंतु मिळाले नाही तरी काही हरकत नाही. आपल्याला तर भुकेल्यास अन्न, तहानेल्यास पाणी, वस्त्रहीनास वस्त्र आणि रोग्याला औषध द्यावयाचे आहे. त्याचप्रमाणे कोणी कोणाला अनुचितरूपाने भयभीत करीत असेल, दुःख देत असेल तर त्याला त्यापासून सोडवणे आणि त्याला अभयदान देणे आपले कर्तव्य आहे.

हां, कुपात्राला मात्र इतके अन्न-पाणी देऊ नये की, त्यामुळे तो पुन्हा हिंसा इत्यादी पापात प्रवृत्त होईल. जसे एखादा हिंसक मनुष्य अन्न पाण्यावाचून मरत आहे तर त्याला तितकेच अन्न द्यावे, जेवढ्याने त्याचे प्राण वाचतील. अशा प्रकारे वरील चार वस्तूंच्या दानात पात्रापात्रता पहावयाची नाही तर आवश्यकता पहावयाची आहे.

भगवंताचा भक्त वस्तू देण्यात पात्र पाहत नाही, तो तर देतच जातो, कारण तो सर्वांमध्ये आपल्या प्रिय प्रभूलाच पाहतो की, या रूपात तर आपले प्रभूच आले आहेत. म्हणून तो दान करीत नाही, कर्तव्य पालन करीत नाही, तर पूजा करत असतो-"**स्वकर्मणा तमभ्यर्च्य**" (१८।४६) तात्पर्य, भक्तांच्या संपूर्ण क्रियेचा संबंध भगवंताशी असतो.

## कर्मफलसंबंधी विशेष गोष्ट

अकराव्या श्लोकापासून बावीसाव्या श्लोकापर्यंतच्या या प्रकरणात जे सात्त्विक यज्ञ, तप आणि दान आले आहेत, ती सर्वची सर्व "दैवी-संपत्ती" आहे आणि जे राजस तसेच तामस यज्ञ, तप आणि दान आले आहेत, ती सर्वची सर्व "आसुरी-संपत्ती" आहे.

आसुरी-संपत्तीत आलेले "राजस" यज्ञ, तप आणि दानाच्या फलाचे दोन विभाग आहेत—दृष्ट आणि अदृष्ट. यातही दृष्टाची दोन फले आहेत. तात्कालिक, कालांतरिक. जसे राजस भोजनानंतर तृप्तीचे होणे तात्कालिक फल आहे आणि रोग इत्यादींचे होणे कालांतरिक फल आहे. तसेच अदृष्टाचीही दोन फले आहेत. लौकिक आणि पारलौकिक

जसे दंभपूर्वक "**दम्भार्थमपि चैव यत्**" (१७।१२), सत्कार, मान, पूज्यतेसाठी "**सत्कारमानपूजार्थम्**" (१७।१८) आणि प्रत्युपकारासाठी "**प्रत्युपकारार्थम्**" (१७।२१) केले गेलेले राजस यज्ञ, तप आणि दानाचे फल "लौकिक" आहे आणि ते ह्याच लोकात, ह्याच जन्मात, याच शरीरात असतानाच मिळण्याची शक्यता असणारे असते.* स्वर्गालाच परम प्राप्य वस्तू समजून त्याच्या प्राप्तीसाठी केले गेलेले यज्ञादिकांचे फल "पारलौकिक" असते. परंतु राजस यज्ञ "**अभिसन्धाय तु फलम्**" (१७।१२) आणि दान "**फलमुद्दिश्य वा पुनः**" (१७।२१) चे फल लौकिक तसेच पारलौकिक दोन्हीही होऊ शकतात. यातही स्वर्गप्राप्तीसाठी यज्ञ इत्यादी करणारे (२।४२-४३, ९।२०-२१) आणि केवळ दम्भ, सत्कार, मान, पूज्यता, प्रत्युपकार, इत्यादीसाठी यज्ञ, तप आणि दान करणारे (१७।१२, १८, २१) दोन्ही प्रकारचे राजस पुरुष जन्म-मरणाला प्राप्त होतात.† परंतु तामस यज्ञ आणि तप करणारे (१७।१३, १९) तामस पुरुष तर अधोगतीला जातात "**अधो गच्छन्ति तामसाः**" (१४।१८), "**पतन्ति नरकेऽशुचौ**" (१६।१६) **आसुरीष्वेव योनिषु** (१६।१९) **ततो यान्त्यधमां गतिम्** (१६।२०)

जी माणसे यज्ञ करून स्वर्गात जातात, त्यांना स्वर्गातही दुःख, मनातील जळजळ, ईर्ष्या इत्यादी होतात.‡ जसे शतक्रतु इंद्रालाही असुरांच्या अत्याचारामुळे दुःख होते. कोणी तपश्चर्या करू लागला तर याच्या मनात उद्वेग होतो. तो भयभीत होतो. याला पूर्वजन्माच्या पापांचे फलही म्हणू शकत नाही कारण त्यांची स्वर्गप्राप्तीतील प्रतिबंधकरूपी पापे नष्ट होतात- "**पूतपापाः**" (९।२०) आणि ते यज्ञाच्या पुण्याने स्वर्ग लोकात जातात. मग त्यांना दुःख, जळजळ, भय इत्यादी होणे कोण्या पापांचे फल आहे? याचे उत्तर असे आहे की, हे सर्व यज्ञात केलेल्या पशुहिंसेच्या पापाचेच फल आहे.

दुसरी गोष्ट, यज्ञ इत्यादी सकामकर्म केल्याने अनेक प्रकारचे दोष येतात. गीतेत आले आहे. "**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः**" (१८।४८) अर्थात् अग्नी असेल तेथे धूर असतोच तसे सर्व कर्म कोणत्या ना कोणत्या दोषाने युक्त असतात. जर सर्व कर्माच्या आरंभात दोष राहतो तर मग सकामकर्मात तर (सकामभाव असल्याने) दोषांची शक्यता जास्तच असते आणि त्यात अनेक प्रकारचे दोष येतातच. म्हणून शास्त्रात यज्ञ केल्यानंतर प्रायाश्चित्त करण्याचे विधान आहे. प्रायश्चित्त विधानाने हे सिद्ध होते की, यज्ञामध्ये दोष (पाप) अवश्य होतात. जर दोष झाले नसते तर प्रायश्चित्त कशासाठी? परंतु वास्तविक प्रायश्चित्त घेतल्यावरही सर्व दोष नष्ट होत नाहीत, त्यांचा काही अंश राहतो. जसे मळालेल्या वस्त्राला साबण लावून धुतले तरीही त्याच्या तंतूत किंचित थोडा मळ राहतच असतो. याच कारणाने इंद्रादी देवतांना-सुद्धा प्रतिकूल परिस्थितीजन्य दुःख भोगावे लागते.

वास्तविक दोषांची पूर्ण निवृत्ती तर निष्कामभावपूर्वक कर्तव्यकर्म करून त्या कर्मांना भगवंताना अर्पण करण्यानेच होते. म्हणून निष्कामभावसहित केली गेलेली कर्मेच श्रेष्ठ आहेत. सर्वात मोठी शुद्धी (दोषनिवृत्ती), "मी तर केवळ भगवंताचाच आहे" अशा प्रकारे अहंता परिवर्तनपूर्वक भगवत्प्राप्तीचा उद्देश बनविल्यानेच होते. याने जितकी शुद्धी होते तितकी कर्माने होत नाही.卐 भगवंतांनी म्हटले आहे—

---

* राजसाच्या दृष्टाचे कालान्तरिक फल आणि अदृष्टाचे लौकिक फल—दोन्ही एकसारखे दिसत असले तरी यात फरक आहे. जसे भोजनाच्या परिणामस्वरूप जे रोग इत्यादी होतील, ते भौतिक (कालान्तरिक) फल आहे अर्थात् तो सरळ भोजनाचाच परिणाम आहे आणि पुत्रेष्टी यज्ञ इत्यादीचे जे फल आहे, ते आधिदैविक (लौकिक) फल आहे अर्थात् ते प्रारब्ध बनून फलाच्या (पुत्रादी) रूपात येते.

† जर राजस पुरुषांचा दंभ (१७।१२, १८) अधिक वाढला, तर ते नरकातही जाऊ शकतात.

‡ स्वर्गातसुद्धा यज्ञ इत्यादी पुण्य कर्मानुसार उच्च, मध्यम आणि कनिष्ठ अशा तीन प्रकारच्या श्रेणी असतात. त्यातही उच्च श्रेणीचे जेव्हा आपल्या समान श्रेणीच्या लोकाना पाहतात तेव्हा त्यांना ईर्ष्या होते की, हे आमच्या समान पदावर का आले? आणि मध्यम तसेच कनिष्ठ श्रेणींच्या लोकांना पाहून त्यांच्या मनात अभिमान होतो की, आम्ही किती मोठे आहोत?

मध्यम श्रेणीचे जेव्हा आपल्यापेक्षा उच्च श्रेणींच्या लोकांना पाहतात, तर त्यांची भोगसामुग्री, पद, अधिकार इत्यादींना पाहून त्यांना ईर्ष्या होते आणि कनिष्ठ श्रेणींच्या लोकांना पाहून अभिमान होतो.

कनिष्ठ श्रेणी असणाऱ्यात उच्च आणि मध्यम श्रेणी असणाऱ्यांना पाहून असहिष्णुता होते, जळजळ होते की, त्यांच्याजवळ इतकी भोगसामुग्री का आहे? ते इतक्या उच्च पद अधिकारावर कसे गेले? आणि आपल्यासमान श्रेणी असणाऱ्यांना पाहून ईर्ष्या होते की, हे आमच्याबरोबर येऊन कसे बसले? त्याचप्रमाणे जे स्वर्गात आले नाहीत, त्यांना पाहून अभिमान होतो की, आम्ही किती उच्च स्थानी-स्वर्गात आहोत.

स्वर्गात जी स्थिती असते तीही तर नित्य नसते, कारण कोणत्याही श्रेणीतील असो पुण्यक्षीण झाल्यावर त्यालाही मृत्युलोकात यावे लागते, "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति" (९।२१) आणि त्याची चिंता, त्याचे भय सदैव असते की, ही स्थिती आमची राहणार नाही, एक दिवस निघून जाईल.

卐 दुसऱ्याची उन्नती सहन न होणे, ईर्ष्या इत्यादी जितके काही दोष आहेत, ते पूर्वकृत कर्माचे फल नाहीत. ते सर्व दोष अंतःकरणाच्या अशुद्धीमुळेच होतात. शास्त्रविहित सकामकर्म केल्याने अंतःकरणाची संपूर्णपणे शुद्धी होत नाही, तर आंशिक शुद्धी होते, ज्यामुळे स्वर्गादी लोकाचे भोग भोगतात. अंतःकरणाची अशुद्धी जेव्हा उद्देश केवळ भगवंताचा होतो, तेव्हाच समाप्त होते.

**सनमुख होई जीव मोहि जबही। जन्म कोटि अघ नासहिं तबहीं॥**
(मानस ५।४४।१)

तीसरी गोष्ट गीतेत अर्जुनाने विचारले होते की, मनुष्य इच्छा नसतानाही पापाचे आचरण का करतो? त्यावेळी भगवंतांनी उत्तरात म्हटले-"**काम एष क्रोध एष रजोगुण-समुद्भवः**" (३।३७) तात्पर्य, रजोगुणापासून उत्पन्न झालेली कामनाच पाप करविते. म्हणून कामनेने केल्या जाणाऱ्या राजस यज्ञाच्या क्रियेत पापे होऊ शकतात.

राजस तसेच तामस यज्ञ इत्यादी करणारे आसुरी-संपत्तीचे असतात आणि सात्त्विक यज्ञ इत्यादी करणारे दैवी-संपत्तीचे असतात. परंतु दैवी-संपत्तीच्या गुणातही जर "आसक्ती" झाली तर रजोगुणाचा धर्म असल्याने ती आसक्तीसुद्धा बंधनकारक होते. (१४।६)

**परिशिष्ट भाव**—शास्त्रात आले आहे की, कलियुगात एकमात्र दान हाच धर्म आहे. म्हणून येन केन प्रकारेही जे दान दिले जाते, ते कल्याण करणारेच होते. याचे तात्पर्य असे आहे की, कलियुगात यज्ञ, दान, तप, व्रत इत्यादी शुभकर्म विधिपूर्वक करणे कठीण आहे. म्हणून कोणत्याही रीतीने देण्याची, त्याग करण्याची सवय लावावी. म्हणून कोणत्याही पद्धतीने का होईना दात देत रहावे.

***संबंध**—सोळाव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात दैवी-संपत्ती मोक्षासाठी आणि आसुरी-संपत्ती बंधनासाठी सांगितली आहे. दैवी-संपत्तीला धारण करणारी सात्त्विक माणसे परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने जे यज्ञ, तप आणि दानरूपी कर्म करतात, त्या कर्मात होणाऱ्या (भाव, विधी, क्रिया इत्यादींच्या) उणीवेच्या पूर्तीसाठी काय केले पाहिजे? हे सांगण्यासाठी भगवान् पुढील प्रकरण आरंभ करतात.*

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा॥२३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ॐ** | = ॐ, | **ब्रह्मणः** | = (ज्या) परमात्म्याचा | **वेदाः** | = वेद |
| **तत्** | = तत्, | **निर्देशः** | = निर्देश (संकेत) | **च** | = तसेच |
| **सत्** | = सत्— | **स्मृतः** | = केला गेला आहे, | **ब्राह्मणाः** | = ब्राह्मण |
| **इति** | = या | **तेन** | = त्याच परमात्म्याद्वारा | **च** | = आणि |
| **त्रिविधः** | = तीन प्रकारच्या नावांनी | | | **यज्ञाः** | = यज्ञ यांची |
| | | **पुरा** | = सृष्टीच्या आरंभी | **विहिताः** | = रचना झाली आहे. |

*व्याख्या*— **ॐ तत्सदिती निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः**—ॐ तत् आणि सत् असा तीन प्रकारचा परमात्म्याचा निर्देश आहे अर्थात् परमात्म्याची तीन नावे आहेत. (या तीन नावांची व्याख्या भगवंतांनी पुढील चार श्लोकात केली आहे)

**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा**—त्या परमात्म्याने प्रथम (सृष्टीच्या आरंभी) वेद, ब्राह्मण आणि यज्ञ निर्माण केले. या तिन्हीपैकी विधी सांगणारे वेद आहेत, अनुष्ठान करणारे ब्राह्मण आहेत आणि क्रिया करण्यासाठी यज्ञ आहेत. आता यात यज्ञ, तप, दान इत्यादींच्या क्रियेमध्ये कोणती उणीव राहिली तर काय करावे? परमात्म्याचे नाव घेतले तर तिची पूर्ती होईल. जसे स्वयंपाकी पाण्याने कणीक भिजवितो, ती मळतो, कधी त्यात पाणी जास्त झाले तर तो काय करतो? आणखी कणीक त्यात मिसळतो. तसेच कोणी निष्कामभावाने यज्ञ, दान इत्यादी शुभ कर्म, केले आणि त्यात काही उणीव, वैगुण्य राहिले तर ज्या भगवंतांनी यज्ञादिक निर्माण केले आहेत, त्या भगवंताचे नाव घेतल्यानेच ते अंग-वैगुण्य निघून जाईल, ठीक होईल. अशी त्याची पूर्ती होते.

**परिशिष्ट भाव**—'महानिर्वाणतन्त्र' यात आले आहे—

**ॐ तत्सदिति मन्त्रेण यो यत्कर्म समाचरेत्। गृहस्थो वाप्युदासीनस्तस्याभीष्टाय तद् भवेत्॥**
**जपो होमः प्रतिष्ठा च संस्काराद्यखिलाः क्रियाः। ॐ तत्सन्मन्त्रनिष्पन्नाः सम्पूर्णाः स्युर्न संशयः॥**
(१४। १५४-१५५)

'ॐ सत् सत्'—या मन्त्राने गृहस्थी अथवा उदासीन (साधू) जे काही कर्म आरंभ करतो, त्याला यामुळे अभीष्ट फलाची प्राप्ती होते. जप, होम, प्रतिष्ठा, संस्कार इत्यादी संपूर्ण क्रिया 'ॐ तत् सत्'—या मंत्राने सफल होतात यात संशय नाही.'

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम्॥२४॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | | नियत | **इति** | = या परमात्म्याच्या नावाचे |
| **ब्रह्मवादिनाम्** | = वैदिक सिद्धांत मानणाऱ्या पुरुषांच्या | **यज्ञदानतपः क्रियाः** | = यज्ञ, दान आणि तपरूप क्रिया | **उदाहृत्य** | = उच्चारण करून (च) |
| **विधानोक्ताः** | = शास्त्रविधीने | **सततम्** | = सदा | **प्रवर्तन्ते** | = आरंभ होतात. |
| | | **ओम्** | = 'ॐ' | | |

*व्याख्या*— **तस्मादोमित्युदाहृत्य...ब्रह्मवादिनाम्**— वेदवादीसाठी अर्थात् वेदांना मुख्य मानणारा जो वैदिक सांप्रदाय आहे, त्यांनी ''ॐ'' चे उच्चारण करणे महत्त्वाचे मानले जाते. ते ''ॐ'' चे उच्चारण करूनच वेदपाठ, यज्ञ, दान, तप इत्यादी शास्त्रविहित क्रियेत प्रवृत्त होतात, कारण जशा गायी सांडाशिवाय फलवती होत नाहीत, त्याचप्रमाणे वेदांच्या जितक्या ऋचा आहेत, श्रुती आहेत, त्या सर्व ''ॐ'' चे उच्चारण केल्याशिवाय फलवती होत नाहीत अर्थात् फल देत नाहीत.

''ॐ'' चे सर्वात प्रथम उच्चारण का केले जाते? कारण सर्वात प्रथम ''ॐ'' प्रणव प्रकट झाला आहे. त्या प्रणवाच्या तीन मात्रा आहेत. त्या मात्रांपासून त्रिपदा गायत्री प्रगट झाली आणि त्रिपदा गायत्रीपासून ऋक्, साम, यजु:—ही वेदत्रयी प्रकट झाली. या दृष्टीने ''ॐ'' सर्वांचे मूळ आहे आणि याच्याच अन्तर्गत गायत्री आहे तसेच सर्वचे सर्व वेदही आहेत. म्हणून जेवढ्या वैदिक क्रिया केल्या जातात त्या सर्व ''ॐ'' चे उच्चारण करूनच केल्या जातात.

**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतपःक्रियाः।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः॥ २५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = 'तत्' नावाने म्हटल्या जाणाऱ्या परमात्म्यासाठीच सर्व काही आहे— | **मोक्षकाङ्क्षिभिः** | = मुक्ती इच्छुक मनुष्यांद्वारा | **यज्ञतपःक्रियाः** | = यज्ञ आणि तपरूप क्रिया |
| | | **फलम्** | = फलाच्या | **च** | = तसेच |
| | | **अनभिसन्धाय** | = इच्छेने रहित होऊन | **दानक्रियाः** | = दानरूप क्रिया |
| **इति** | = असे मानून | **विविधाः** | = अनेक प्रकारच्या | **क्रियन्ते** | = केल्या जातात. |

*व्याख्या*— **तदित्यनभिसन्धाय....मोक्षकाङ्क्षिभिः**— केवळ तो परमात्मा प्रसन्न व्हावा या उद्देशाने, किंचिन्मात्रही फलाची इच्छा न ठेवता शास्त्रीय यज्ञ, तप, दान इत्यादी शुभ कर्म केले जावेत. कारण विहित-निषिद्ध, शुभ-अशुभ इत्यादी सर्व क्रियांचा आरंभ होतो आणि समाप्ती होते. त्याचप्रमाणे त्या क्रियेचे जे फल प्राप्त होते त्याचाही संयोग होतो आणि वियोग होतो. अर्थात् कर्मफलाच्या भोगाचाही आरंभ होतो आणि समाप्ती होते. परंतु परमात्मा तर त्या क्रिया आणि फलभोगाच्या पूर्वीही आहेत तसेच क्रिया आणि फलभोगाच्या समाप्तीनंतरही आहेत तसेच क्रिया आणि फलभोगकाळीही जसेच्या तसे आहेत. परमात्म्याची सत्ता नित्य-निरंतर असते. नित्य-निरंतर राहणाऱ्या या सत्तेकडे लक्ष करविण्यातच ''**तत् इति**'' पदाचे तात्पर्य आहे आणि उत्पत्ती-विनाशशील फलाकडे दुर्लक्ष करण्यासाठी ''**अनभिसंधाय फलम्**'' पदांचे तात्पर्य आहे. अर्थात् नित्य-निरंतर राहणाऱ्या तत्त्वाची स्मृती राहिली पाहिजे आणि नाशवान् फलाची अभिसंधी (इच्छा) मुळीच राहू नये.

नित्य-निरंतर वियुक्त होणाऱ्या, प्रतिक्षण अभावात जात असलेल्या या संसारात जे काही पाहण्यात, ऐकण्यात आणि जाणण्यात येते, त्यालाच आपण प्रत्यक्ष, सत्य मानतो आणि त्याच्या प्राप्तीतच आपण आपली बुद्धिमानी व बल यांना सफल मानतो. या परिवर्तनशील संसाराला प्रत्यक्ष मानल्यामुळेच सदा-सर्वदा सर्वत्र परिपूर्ण असूनही तो परमात्मा आपल्याला प्रत्यक्ष दिसत नाही. म्हणून एक परमात्मप्राप्तीचाच उद्देश ठेवून त्या संसाराचा अर्थात् अहंता ममतेचा (मी-माझेपणा) त्याग करून, त्यांनीच प्रदान केलेल्या शक्तीने, यज्ञ इत्यादींना त्यांचेच मानून निष्कामभावपूर्वक, त्यांच्यासाठीच यज्ञ इत्यादी शुभ कर्म केली पाहिजेत. यातच मनुष्याची वास्तविक बुद्धिमानी आणि बल (पुरुषार्थ) याची सफलता आहे. तात्पर्य संसार जो प्रत्यक्ष प्रतीत होत आहे, त्याचे तर निराकरण करावयाचे आहे आणि ज्याला अप्रत्यक्ष मानतो, त्या ''**तत्**'' नावाने म्हटल्या जाणाऱ्या परमात्म्याचा अनुभव करून घ्यावयाचा आहे.

भगवद्भक्त (भगवंताचा उद्देश ठेवून) ''तत्'' पदाचे बोधक राम, कृष्ण, गोविंद, नारायण, वासुदेव, शिव इत्यादी नावांचे उच्चारण करून सर्व क्रिया आरंभ करतात.

आपल्या कल्याणाची इच्छा असणारी माणसे यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत, जप, स्वाध्याय, ध्यान, समाधी इत्यादी ज्या काही क्रिया करतात त्या सर्व भगवंतासाठीच, भगवंताच्या प्रसन्नतेसाठी, भगवंताच्या आज्ञापालनासाठीच करतात, आपल्यासाठी करीत नाहीत. कारण ज्यांच्याकडून क्रिया केल्या जातात ते शरीर, इंद्रिये, अंत:करण इत्यादी सर्व परमात्म्याचेच आहेत, आपले नाहीत. जर शरीर इत्यादी आपले नाही. तर घर, जमीन-जुमला, धन, कुटुंब इत्यादीही आपले नाहीत. हे सर्व प्रभूचे आहेत आणि यांच्या ठिकाणी जे सामर्थ्य, समज इत्यादी आहेत, तेही सर्व प्रभूचेच आहेत आणि आपण स्वत: ही प्रभूचेच आहोत. आपण प्रभूचे आहोत आणि प्रभू आपले आहेत, या भावनेने ते सर्व क्रिया प्रभूच्या प्रसन्नतेसाठीच करतात.

**परिशिष्ट भाव**—परमात्म्यासाठी परोक्षवाचक 'तत्' पदाच्या प्रयोगाचे तात्पर्य असे आहे की, परमात्मा अलौकिक आहेत—'**उत्तम: पुरुषस्त्वन्य:**' (गीता १५।१७). ते विचाराचे विषय नव्हेत, तर श्रद्धा-विश्वासाचे विषय आहेत.

***संबंध***—*चोवीसाव्या श्लोकात ''ॐ'' ची आणि पंचवीसाव्या श्लोकात ''तत्'' शब्दाची व्याख्या करून आता भगवान् पुढील दोन श्लोकांत पाच प्रकाराने सत् शब्दाची व्याख्या करतात.*

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्द: पार्थ युज्यते॥ २६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **सद्भावे** | = सत्य भावात | **प्रशस्ते** | = प्रशंसनीय |
| **सत्** | = 'सत्' | **च** | = आणि | **कर्मणि** | = कर्माशी |
| **इति** | = असे | **साधुभावे** | = श्रेष्ठ भावात | **सत्** | = 'सत्' |
| **एतत्** | = जे परमात्म्याचे नाव त्याचा | **प्रयुज्यते** | = प्रयोग केला जातो | **शब्द:** | = शब्द |
| | | **तथा** | = तसेच | **युज्यते** | = जोडला जातो. |

*व्याख्या*—**सद्भावे**—''परमात्मा आहेत'' अशा प्रकारे परमात्म्याच्या सत्तेचे (असणेपणा) नाव ''सद्भाव'' आहे. त्या परमात्म्याची सगुण-निर्गुण, साकार-निराकार इत्यादी जितकी रूपे आहेत आणि सगुण-साकारातही त्याचे विष्णू, राम, कृष्ण, शिव, शक्ती, गणेश, सूर्य इत्यादी जितके अवतार आहेत, ते सर्वचे सर्व ''सद्भावा'' च्या अंतर्गत येतात. अशा प्रकारे ज्याचा कोणत्याही देश, काळ, वस्तू इत्यादीमध्ये कधी अभाव नसतो, अशा परमात्म्याची अनेक रूपे आहेत, अनेक नाम आहेत, अनेक प्रकारच्या लीला आहेत, त्या सर्वच्या सर्व ''सद्भाव'' च्या अंतर्गत येतात.

**साधुभावे**—परमात्मप्राप्तीसाठी वेगवेगळ्या सांप्रदाया-मध्ये वेगवेगळी जितकी साधने सांगितली गेली आहेत, त्यात अंत:करणाचे दया, क्षमा इत्यादी जे श्रेष्ठ, उत्तम भाव आहेत ते सर्वचे सर्व ''साधुभाव'' च्या अंतर्गत येतात.

**सदित्येतत्प्रयुज्यते**—सत्तेत आणि श्रेष्ठतेत ''सत्'' शब्दाचा प्रयोग केला जातो. अर्थात् जो सदा आहे, ज्यात कधी किंचित्मात्रही कमी आणि अभाव होत नाही. अशा परमात्म्यासाठी आणि त्या परमात्म्याच्या प्राप्तीसाठी दैवी-संपत्तीचे जे सत्य, क्षमा, उदारता, त्याग इत्यादी श्रेष्ठ गुण आहेत, त्यांच्यासाठी ''सत्'' शब्दाचा प्रयोग केला जातो. जसे सत्-तत्त्व, सद्गुण, सद्भाव इत्यादी.

**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्द: पार्थ युज्यते**—परमात्मप्राप्तीसाठी वेगवेगळ्या सांप्रदायांत वेगवेगळी जितकी साधने सांगितली गेली आहेत, त्यात क्रियारूपाने जितके श्रेष्ठ आचरण आहेत, ते सर्वचे सर्व ''**प्रशस्ते कर्मणि**'' च्या अंतर्गत आहेत. त्याचप्रमाणे शास्त्रविधीनुसार यज्ञोपवीत, विवाह इत्यादी संस्कार, अन्नदान, भूमीदान, गोदान इत्यादी दान आणि आड-विहीर खोदविणे, धर्मशाळा बनविणे, मंदिर बनविणे, बगीचे लावणे इत्यादी श्रेष्ठ कर्मसुद्धा ''**प्रशस्ते कर्मणि**'' च्या अंतर्गत येतात. या सर्व श्रेष्ठ आचरणात, श्रेष्ठ कर्मात सत् शब्दाचा प्रयोग केला जातो जसे सदाचार, सत्कर्म, सत्सेवा, सद्व्यवहार इत्यादी.

**परिशिष्ट भाव**—परमात्म्याच्या अस्तित्वाला अथवा असणेपणा याला '**सद्भाव**' म्हणतात, ज्याचा कधी अभाव होत नाही—'**नाभावो विद्यते सत:**' (गीता २।१६). बहुतेक सर्व आस्तिक हा भाव तर मानतातच की, सर्वोपरी सर्व नियंता कोणती एक विलक्षण शक्ती सदा विद्यमान आहे आणि ती अपरिवर्तनशील आहे. जो संसार प्रत्येक क्षणाला प्रत्यक्ष बदलतो आणि ज्याचा

अभाव होतो, त्याला 'आहे' अथवा स्थिर कसे म्हणता येईल? कारण इंद्रिये, बुद्धी यांनी ज्याला पाहतो, जाणतो, तो संसार पूर्वी नव्हता, पुढे राहणार नाही आणि वर्तमानातही जात आहे—हा सर्वांचा अनुभव आहे. ज्यांच्याद्वारा संसाराला पाहतो, जाणतो, ती इंद्रिये आणि बुद्धी इत्यादीही संसाराचीच आहेत. असे असूनही आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, 'नाही' असूनही संसार 'आहे' च्या रूपात स्थिर दिसत आहे. जर संसार वास्तविक असता तर बदलला नसता आणि बदलत आहे तर 'आहे' नव्हे. म्हणून हा 'असणेपणा' संसार-शरीरादीचा नव्हे, तर सत्-तत्त्वाचा परमात्म्याचा आहे, ज्यामुळे नसूनही संसार 'आहे' दिसतो.

अंत:करणाच्या श्रेष्ठ भावांना '**साधुभाव**' म्हणतात. परमात्म्याची प्राप्ती करविणारे असल्यामुळे श्रेष्ठ भावांसाठी 'सत्' शब्दाचा प्रयोग केला जात आहे. श्रेष्ठ भाव अर्थात् सद्गुण-सदाचार दैवी-संपत्ती आहे. दैवी-संपत्ती 'सत्' आहे आणि आसुरी-संपत्ती 'असत्' आहे. मुक्तिदायक सर्व साधन 'सत्' आहेत आणि बंधनकारक सर्व कर्म 'असत्' आहेत. दुर्गुण-दुराचार 'असत्' आहेत, परंतु त्यांचा त्याग 'सत्' आहे. असत्‌चा त्यागही 'सत्' आहे आणि सत्‌चे ग्रहणही 'सत्' आहे. वास्तविक असत्‌च्या त्यागाची जितकी आवश्यकता आहे, तितकी 'सत्' ला ग्रहण करण्याची जरूरी नाही. 'असत्' चा त्याग केल्याविना आणलेले 'सत्' वरुन चिटकविले जाते, ते कायम राहत नाही. परंतु असत्‌चा त्याग करण्याने 'सत्' चा अंत:करणात उदय होतो. म्हणून आपण ज्याला असत्‌रूपाने जाणतो, त्याचा त्याग केल्याने 'सत्' चा अनुभव होतो.

यज्ञ, तप, दान, तीर्थ, व्रत, पूजा-पाठ, विवाह इत्यादी जितके काही शास्त्रविहित शुभकर्म आहेत, ते स्वत:च प्रशंसनीय असल्यामुळे सत्कर्म आहेत. परंतु या प्रशंसनीय कर्मांचा संबंध जर भगवंताशी नसेल तर हे 'सत्' न म्हणविता केवळ शास्त्रविहित कर्म राहतात. जरी दैत्य-दानवही तपश्चर्या इत्यादी प्रशंसनीय कर्म करतात, तरी असद्भाव अर्थात् आपला स्वार्थ आणि दुसऱ्याचे अहित याचा भाव राहिल्याने ते बंधनकारक असत् कर्म होतात. (याच अध्यायाचा एकोणीसावा श्लोक). त्यांच्याद्वारा जरी ब्रह्मलोकाचीही प्राप्ती झाली तरी तेथून परत यावे लागते—'**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन**' (गीता ८। १९). भगवत्प्राप्तीसाठी कर्म करणारे मनुष्य दुर्गतीला प्राप्त होत नाहीत—'**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति**' (गीता ६। ४०). कारण त्याचे फल 'सत्' मिळते. जे कर्म स्वार्थ आणि अभिमान यांचा त्याग करून प्राणिमात्राच्या हिताच्या भावनेने केले जातात, तेच वास्तविक प्रशंसनीय सत्कर्म होतात.

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते॥ २७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यज्ञे** | = यज्ञ | **एव** | = (ती) ही | | निमित्ताने केले जाणारे |
| **च** | = तसेच | **सत्** | = 'सत्'— | **कर्म** | = कर्म |
| **तपसि** | = तप | **इति** | = अशी | **एव** | = सुद्धा |
| **च** | = आणि | **उच्यते** | = म्हटली जाते | **सत्** | = 'सत्'— |
| **दाने** | = दानरूप क्रियेत (जी) | **च** | = आणि | **इति** | = असे |
| **स्थितः** | = स्थिती (निष्ठा) आहे, | **तदर्थीयम्** | = त्या परमात्म्याच्या | **अभिधीयते** | = म्हटले जाते. |

***व्याख्या*— यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते**—यज्ञ, तप आणि दानरूप प्रशंसनीय क्रियांमध्ये जी स्थिती (निष्ठा) असते ती "सत्" म्हटली जाते. जशी एखाद्याची सात्त्विक यज्ञात, एखाद्याची सात्त्विक तपात आणि एखाद्याची सात्त्विक दानात जी स्थिती (निष्ठा) असते अर्थात् यापैकी एकेका तत्त्वाविषयी जी अंत:करणात् श्रद्धा आहे व ते करण्याची जी तत्परता आहे ती "सन्निष्ठा" (सत्‌निष्ठा) म्हटली जाते.

"**च**" पद देण्याचे तात्पर्य, ज्याप्रमाणे लोकांची सात्त्विक यज्ञ, तप आणि दानात श्रद्धा निष्ठा असते, त्याच-प्रमाणे कोणाची वर्णधर्मात, कोणाची आश्रमधर्मात, कोणाची सत्यव्रत पालनात, कोणाची अतिथि-सत्कारात, कोणाची सेवेत, कोणाची आज्ञा पालनात, कोणाची पातिव्रत्य पालनात, कोणाची गंगेवर, तर कोणाची यमुनेवर, कोणाची गोदावरीवर, कोणाची प्रयागावर इत्यादी विशेष तीर्थावर जी अंत:करणातून श्रद्धा आहे, त्यात जी आवड, विश्वास आणि तत्परता आहे, तीसुद्धा "सन्निष्ठा" (सत्-निष्ठा) म्हटली जाते.

**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते**—त्या प्रशंसनीय कर्माशिवाय कर्माची दोन प्रकारची स्वरूपे असतात. लौकिक, (स्वरूपानेच संसारसंबंधी) आणि पारमार्थिक (स्वरूपानेच भगवत्संबंधी).

(१) वर्णाश्रमानुसार जीविकेसाठी यज्ञ, अध्यापन, व्यापार, शेती इत्यादी व्यावहारिक कर्तव्यकर्म आणि खाणे-पिणे, उठणे-बसणे, चालणे-फिरणे, झोपणे-जागणे इत्यादी शारीरिक कर्म हे सर्व "लौकिक" कर्म आहेत.

(२) जप-ध्यान, पाठ-पूजा, कथा-कीर्तन, श्रवण-मनन, चिंतन-ध्यान इत्यादी जे काही केले जाईल हे सर्व "पारमार्थिक" कर्म आहेत.

या दोन्ही प्रकारच्या कर्मांना आपल्या सुख-आराम इत्यादींचा उद्देश न ठेवता निष्कामभावाने तसेच श्रद्धा-विश्वासाने केवळ भगवंतासाठी अर्थात् भगवत्प्रीत्यर्थ केले गेले तर ती सर्वची सर्व "तदर्थीय कर्म" होतात. भगवदर्थ असल्याकारणाने त्यांचे फल "सत्" होते. अर्थात् सत्स्वरूप परमात्म्याशी संबंध झाल्याने ती सर्व दैवी-संपत्ती होते, जी मुक्तीदात्री आहे. ज्याप्रमाणे अग्नीत लाकडाचा तुकडा ठेवला असता अग्नी त्याला अग्नीरूप बनवून टाकतो. ही सर्व अग्नीचीच विशेषता आहे की, लाकूड देखील अग्नीरूप होऊन जाते. त्याचप्रमाणे त्या परमात्म्यासाठी जी जी कर्मे केली जातील ती सर्व सत् अर्थात् परमात्मस्वरूप होतात अर्थात् त्या कर्मांने परमात्म्याची प्राप्ती होते. त्या कर्मात जी काही विशेषता आली आहे, ती परमात्म्याच्या संबंधामुळेच आली आहे. वास्तविक तर कर्मात काहीही विशेषता नाही.

येथे "**तदर्थीयम्**" म्हणण्याचे तात्पर्य, जो स्वर्ग इत्यादी भोगभूमींची, उच्च भोगांची इच्छा करीत नाही, केवळ परमात्मप्राप्तीच करू इच्छितो, आपले कल्याण इच्छितो, मुक्ती इच्छितो, अशा साधकाची जितकी पारमार्थिक साधने पूर्णतेला गेली आहेत, ती सर्व "सत्" होतात. याविषयी भगवंतांनी म्हटले आहे की, "कल्याणकारी काम करणाऱ्या कोणाचीही दुर्गती होत नाही" (६।४०) एवढेच नव्हे तर "जो योगाचा (समता अथवा परमात्मतत्त्व) जिज्ञासू असतो तो देखील वेदोक्त स्वर्गादिक प्राप्तीसाठी सांगितलेल्या सकाम कर्माहून वर उठतो" (६।४४) कारण ती कर्मे तर फल देऊन नष्ट होतात, परंतु त्या परमात्म्यासाठी केलेले साधन—कर्म नष्ट होत नाही तर "सत्" होते.

**परिशिष्ट भाव**—पंचवीसाव्या श्लोकात निष्कामभावाने कर्म करण्याची गोष्ट आली होती—'**अनभिसन्धाय फलम्**'. आता येथे भगवंतासाठी कर्म करण्याचा विषय आला आहे. मुक्तीची इच्छा करणारे निष्कामभावाने कर्म करतात—'**मोक्षकाङ्क्षिभिः**' (गीता १७।२५) आणि भक्तीचे इच्छुक भगवंतासाठी कर्म करतात (गीता—नवव्या अध्यायाचा सव्वीसावा, सत्तावीसावा, अठ्ठावीसावा श्लोक).

भगवंताचा संबंध झाल्यानेही कर्म 'सत्' अर्थात् सत्-फल देणारे होतात आणि असत्च्या संबंधाचा त्याग झाल्यानेही कर्म 'सत्' होतात.

***संबंध**—पूर्व श्लोकात आले आहे की, परमात्म्याच्या उद्देशाने केली गेलेली कर्म "सत्" होतात. परंतु परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने रहित जी कर्म केली जातात त्यांची कोणती संज्ञा होईल? हे पुढील श्लोकात सांगतात.*

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह॥ २८॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | | जे काही | **इह** | = येथेही मिळत |
| **अश्रद्धया** | = अश्रद्धेने | **कृतम्** | = केले जाईल, | **न** | = नाही |
| **हुतम्** | = केलेले हवन, | | (ते सर्व) | **च** | = आणि |
| **दत्तम्** | = दिलेले दान (आणि) | **असत्** | = 'असत्'— | **प्रेत्य, न** | = मृत्यूनंतरही मिळत नाही अर्थात् याचे कुठेही सत् फल मिळत नाही. |
| **तप्तम्** | = केलेले तप | **इति** | = असे | | |
| **च** | = तसेच | **उच्यते** | = म्हटले जाते. | | |
| **यत्** | = (आणखीही) | **तत्** | = त्याचे (फल) | | |

*व्याख्या*— **अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्**—अश्रद्धेने यज्ञ, दान व तप केले जाईल आणि "**कृतं च यत्**"* अर्थात् ज्याची शास्त्रात आज्ञा केलेली असते, असे जे काही कर्म अश्रद्धेने केले गेले ते सर्व "असत्" म्हटले जाते.

* येथे "सहचरितासहचरितयोर्मध्ये सहचरितस्यैव ग्रहणम्"— व्याकरणाच्या या न्यायानुसार यज्ञ दान आणि तपाच्या साहचर्यामुळे "कृतम्" पदाने शास्त्रीय कर्मच घेतली जातील.

''**अश्रद्धया**'' पदात श्रद्धेच्या अभावाचे वाचक ''नञ्'' समास आहे, ज्याचे तात्पर्य आसुरलोक, परलोक, पुनर्जन्म, धर्म, ईश्वर, इत्यादीत श्रद्धा ठेवीत नाहीत—

**बरन धर्म नहिं आश्रम चारी। श्रुति बिरोध रत सब नर नारी॥**

(मानस ७।९८।१)

अशा प्रकारचे विरुद्ध भाव ठेवून ते यज्ञ, दान इत्यादी क्रिया करतात.

जर त्यांची शास्त्रावर श्रद्धाच नसते तर मग ते यज्ञ इत्यादी शास्त्रीय कर्म का करतात? ते ती शास्त्रीय कर्म या-साठी करतात की, लोकात त्या कर्माचा प्रचार, प्रसार आहे. ती कर्म करणाऱ्यांचा लोक आदर करतात तसेच त्यांना समाज सज्जन समजतो. म्हणून समाजात मान-सन्मान प्राप्त करून घेण्यासाठी आणि जे यज्ञादी शास्त्रीय कर्म करतात, त्यांच्या पंक्तीत, श्रेणीत आपली गणना व्हावी यासाठी श्रद्धा नसूनही शास्त्रीय कर्म करतात.

**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह**—अश्रद्धेने यज्ञ इत्यादी जे काही शास्त्रीय कर्म केले जाईल ते सर्व ''**असत्**'' म्हटले जाते. त्याचे या लोकातही फल मिळत नाही आणि परलोकातही फल मिळत नाही. तात्पर्य, सकाम-भावनेने श्रद्धा आणि विधीपूर्वक शास्त्रीय कर्म केल्याने येथे धन, वैभव, स्त्री-पुत्र, इत्यादीची प्राप्ती आणि मृत्यूनंतर स्वर्गादी लोकांची प्राप्ती होऊ शकते आणि त्याच कर्मांना निष्कामभावनेने श्रद्धा आणि विधीपूर्वक केल्याने अंतः-करणाची शुद्धी होऊन परमात्मप्राप्ती होते, परंतु अश्रद्धेने कर्म करणाऱ्यांना यापैकी कोणतेही फल मिळत नाही.

जर येथे म्हटले की, अश्रद्धेने जे काही केले जाते त्याचे या लोकात आणि परलोकात काहीही फल मिळत नाही तर जितकी पाप कर्मे केली जातात, ती सर्व अश्रद्धेनेच केली जातात. तर मग त्याचे कोणतेही फल मिळवयास नको. आणि मनुष्य भोग भोगणे व संग्रह करणे या इच्छेने अन्याय, अत्याचार, असत्य, कपट, धोकेबाजी इत्यादी जितकी काही पाप-कर्म करतो, त्या कर्मांचे फल दंडही इच्छित नाही पण असे होत नाही. कारण कर्माचा असा नियम आहे की, आसक्त माणूस आसक्तीने जे काही कर्म करतो त्याचे फल कर्त्याची इच्छा असो की नसो, ते त्याला मिळतेच. म्हणून आसुरी-संपत्तीयुक्त मनुष्यास बंधन आणि आसुरी योनी तसेच नरकाची प्राप्ती होते.

लहानात लहान आणि साधारण कर्मसुद्धा जर परमात्म्याच्या उद्देशानेच निष्कामभावपूर्वक केले, तर ते कर्म ''सत्'' होते अर्थात् परमात्म्याची प्राप्ती करविणारे होते. परंतु मोठ्यातमोठे यज्ञादी कर्मसुद्धा जर श्रद्धापूर्वक आणि शास्त्रीय विधि-विधानाने सकामभावपूर्वक केले तर ते कर्मही फल देऊन नष्ट होते, परमात्म्याची प्राप्ती करविणारे होत नाही. तसेच ती यज्ञादी कर्म जर अश्रद्धेने केली, तर ती सर्व ''असत्'' होतात अर्थात् ''सत्'' फल देणारी होत नाहीत. तात्पर्य, परमात्म्याच्या प्राप्तीत क्रियेची प्रधानता नसते, तर श्रद्धा-भावाची प्रधानता असते.

पूर्वोक्त सद्भाव, साधुभाव, प्रशस्तकर्म, सत्स्थिती, आणि तदर्थीय कर्म हे पाचही परमात्म्याची प्राप्ती करविणारे असल्याने अर्थात् ''सत्'' परमात्म्याशी संबंध जोडणारे असल्याने ''सत्'' म्हटली जातात.

अश्रद्धेने केली गेलेली कर्म ''असत्'' का होतात? वेद, भगवान् आणि शास्त्र यांनी कृपा करून मनुष्याच्या कल्याणासाठीच ही शुभ कर्म सांगितली आहेत. परंतु जी माणसे या तिन्हीवर अश्रद्धा करून शुभ कर्म करतात, त्यांची ही सर्व कर्म ''असत्'' होतात. या तिन्हीवर केलेल्या अश्रद्धेमुळे त्यांना नरक इत्यादी दंड मिळावयास पाहिजे, परंतु त्यांचे कर्म शुभ असल्याने त्या कर्मांचे कोणतेही फल मिळत नाही, हाच त्यांच्यासाठी दंड आहे.

मनुष्यांनी यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत इत्यादी शास्त्र-विहित कर्मांना श्रद्धापूर्वक आणि निष्कामभावाने करणे हे योग्य आहे. भगवंतांनी विशेष कृपा करून मानवशरीर दिले आहे आणि या देहात असताना शुभ कर्म केल्याने आपल्याला आणि सर्व लोकांना लाभ होतो. म्हणून ज्यापासून आत्ता आणि परिणामी सर्वांचे हित होते, असे श्रेष्ठ कर्तव्यकर्म श्रद्धापूर्वक आणि भगवंताच्या प्रसन्नतेसाठी करीत राहिले पाहिजे.

**परिशिष्ट भाव—** '**कृतं च यत्**' पदांत नामजप, कीर्तन इत्यादी येणार नाहीत कारण त्यांत भगवंताचा संबंध असल्यामुळे ते 'कर्म' नाहीत, तर 'उपासना' आहे.

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभाग-योगो नाम सप्तदशोऽध्यायः॥ १७॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील ''श्रद्धात्रयविभागयोग'' नावाचा सतरावा अध्याय पूर्ण झाला॥ १७॥**

या अध्यायात श्रद्धेचे तीन विभाग केले गेले आहेत— सात्त्विकी, राजसी आणि तामसी. या विभागांना जो योग्य प्रकारे जाणून घेईल, तो सात्त्विकी श्रद्धेचे ग्रहण आणि राजसी-तामसी श्रद्धेचा त्याग करील. राजसी, तामसी श्रद्धेचा त्याग होताच (सात्त्विकी श्रद्धेने) भगवंताशी असलेल्या स्वत:सिद्ध नित्यसंबंधाचा अनुभव होईल. म्हणून या अध्यायाचे नाव "श्रद्धात्रयविभागयोग" ठेवले गेले आहे.

## सतराव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ सप्तदशोऽध्यायः**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची चार, श्लोकांची तीनशे अडतीस आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग तीनशे अठ्ठावन आहे.

(२) या अध्यायात "**अथ सप्तदशोऽध्यायः**" ची आठ, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची तेरा, श्लोकांची आठशे शहाण्णव आणि पुष्पिकेची एकावन अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग नऊशे अडुसष्ट आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायामध्ये दोन उवाच आहेत "**अर्जुन उवाच**" आणि "**श्रीभगवानुवाच**"

## सतराव्या अध्यायात प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या अठ्ठावीस श्लोकांपैकी तीसऱ्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" आणि तीसऱ्या चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**संकीर्ण-विपुला**", दहाव्या आणि बाराव्या श्लोकाच्या प्रथम चरणात तसेच पंचवीसाव्या-सव्वीसाव्या श्लोकांच्या तृतीय चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न विपुला**", सोळाव्या-सतराव्या श्लोकांच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", अकराव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**" आणि एकोणीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**" संज्ञेचे छन्द आहेत. शेष एकोणीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.